


( कथा-संग्रह )



यशवंत गोपाळ जोशी



प्रथमावृत्ति

१९३४



किंमत १ रुपया

प्रकाशक :
अनंत गोपाळ जोशी,
८५४ सदाशिव पेठ, पुणें २.

मुद्रक
श्रीपाद रघुनाथ राजगुरु,
'राजगुरु आणि कंपनीज् प्रेस',
५१३ शनवार, पुणें २.

# पुनर्भेट

'पुनर्भेट' भाग पहिला प्रसिद्ध झाल्यानंतर माझ्या हातून फारसें कांहीं लिहून झालेंच नाहीं. तेव्हां त्यानंतर जें कांहीं थोडें लिहिलें तें, व पूर्वींच प्रसिद्ध झालेल्या पण संग्रहांत संकलित न केलेल्या अशा सोळा कथांची ही 'पुनर्भेट' मी वाचकांना सादर करीत आहे. पहिल्या भागाचें वाचकांनीं योग्य स्वागत केलें व त्याच भरंवशावर मी हा 'पुनर्भेट' भाग दुसरा प्रसिद्ध करीत आहे.

यांत प्रसिद्ध झालेल्या कथा यशवंत, स्फूर्ति, पारिजात, विविधवृत्त, लोकमान्य, निर्भीड व बालबोध यांमध्यें प्रसिद्ध झालेल्या आहेत.

माझे स्नेही श्री० बापूराव राजगुरु यांनीं पुस्तक सुंदर छापून दिल्याबद्दल, डेक्कन प्रिंटिंग प्रेसचे मालक श्री० यशवंतराव गद्रे यांनीं हौसेनें कव्हर छापून दिल्याबद्दल व पुण्याचे सुप्रसिद्ध ब्लॉक मेकर दत्तोपंत फडके ( डेक्कन फोटो झिंको, पुणें ) यांनीं ब्लॉक तयार करून दिल्याबद्दल, मी या सर्वांचा ऋणी आहे. तसेंच माझे स्नेही श्री० रा. द. ब्रम्हे, श्री० वि. ग. ताम्हणकर, श्री० गोंधळेकर व श्री० थत्ते यांनींहि आपआपल्या परीनें 'पुनर्भेट' ला हातभार लावलेला आहे.

ऑगस्ट १९३४.
८५४ सदाशिव,
पुणें नं. २.

नम्र साहित्यसेवक
यशवंत गोपाळ जोशी

## माझें पुढील प्रकाशन

सुप्रसिद्ध लघुकथा-लेखक व कादंबरीकार
श्री० वि. स. खांडेकर यांची नवीन स्वतंत्र सामाजिक कादंबरी

### पांढरे ढग : : : :

प्रीति व नीति या क्षेत्रांतील नव्या
व जुन्याचा झगडा.

---

श्री० यशवंत गोपाळ जोशी यांची स्वतंत्र सामाजिक कादंबरी

### हृदय आणि बटाटे : : :

[ही मनोविश्लेषणात्मक, गूढगुंजनात्मक व सर्व सामाजिक प्रश्नांवर एकजात हळुवार जिव्हाळ्यानें लिहिलेली करुणरसपूर्ण भावमधुर कादंबरी.]

---

### अमंगल मांगल्य : : : :

सुप्रसिद्ध कथालेखक श्री० विष्णु विनायक बोकील बी. ए., बी. टी. यांची घटस्फोटाच्या विषयावरील—स्वतंत्र सामाजिक कादंबरी

---

### बिल्वपत्र : : : :

सुप्रसिद्ध नाटककार श्री० सदाशिव अनंत शुक्ल
यांनीं लिहिलेल्या तीन सामाजिक कथा

---

प्रकाशक—यशवंत गोपाळ जोशी, ८५४ सदाशिव, पुणें.

## श्री० यशवंत गोपाळ जोशी
## यांचीं इतर पुस्तकें

---

पुनर्भेट—भाग १ ला
(कथासंग्रह) किंमत १ रु.
संगीत भोळाशंकर ,, १ रु.
संगीत श्रीमुखांत ,, १२ आ.
बोलका सिनेमा
(प्रहसन) ,, ८ आ.
हिरकणी (कादंबरी) ,, १ रु.

---

**संकल्पित**

नातेवाईक (कथासंग्रह)
माझीं विसांव्याचीं ठिकाणें
(कथासंग्रह)

कांहीं मुलाखती
हृदय आणि बटाटे
(सामाजिक कादंबरी)

---

# कथाक्रम



पण बाळानें त्यांचे ओचेच धरून ठेवले—[ पान ७४ ]




# ईश्वराची लघुकथा!

उन्हाळ्याचे दिवस होते. दिवाणखान्यांत एक सोळा वर्षांची मुलगी एकसारखी येरझारा घालीत होती. वेळ सुमारें चार-साडे-चारची. उन्ह मी म्हणत होतें. रस्त्याला रहदारी कमी होती.

ती मुलगी क्षणांत खुर्चीवर बसे—क्षणांत सज्जांत जाई. क्षणांत धाडधाड जिना उतरून दरवाजांत उभी राही. तिच्या घरासमोर वाहणारे तिन्ही रस्ते ती न्याहाळी. येवढ्याच श्रमानें तिच्या कपाळावर घामाचे थेंब उभे राहात; तेहि कसेबसे घाईनें पदराला पुसून पुन्हा जातां जातां रस्त्यावर नजर टाकीत; धाडधाड जिना चढून पुन्हा ती दिवाणखान्यांत येऊन बसे. आतां तिला खुर्चीवर बसण्या-चाहि कंटाळा आला होता.

धांदलीनेंच तिनें भिंतीला टेंकून ठेवलेला तक्क्या सतरंजीवर आडवा टाकला आणि तो तक्क्या उशाला घेऊन ती स्वस्थ पडून राहिली.

ती समोर पाहात होती.

रिकामपणीं मनुष्य सहज समोर, अगर कुठें तरी पाहात असतो; पण त्या वेळेला तो काय पाहात असतो, हें कुणाला तरी सांगतां येईल का? आपलें आपल्यालाच सांगतां येणार नाहीं— मग इतरांचें कुणाला काय सांगतां येणार?

अशा तऱ्हेनेंच ती समोर पाहात होती.

नंतर तिनें डोळे मिटून घेतले आणि ठरवलें; आतां दाराशीं टांगा थांबल्याचा आवाज ऐकल्याशिवाय डोळे म्हणून उघडायचे नाहींत.

*        *        *        *

त्या मुलीचें नांव होतें सिंधु. ती अद्याप लग्नाची होती. तिचे वडील तिच्याकरितां स्थळें पाहण्याकरितां परगांवीं गेलेले होते, आणि ते आतां यायचे होते. सिंधूच्या येरझारा ज्या चालल्या होत्या त्या तेवढ्याकारितांच होत्या. दोन वर्षांपूर्वीं सिंधूची आई सिंधूला रडवून गेली होती; आणि नंतर सहा महिन्यांनींच दुसरी नवी आई घरांत आली होती!

सिंधूची नवी आई सुद्धां अपवादात्मकच होती. मायलेकींत सावत्रपणाच्या कल्पना कधींच आल्या नाहींत. दीड वर्षांत नव्या पोरसवदा आईनें सिंधूला खरोखरच मुलीसारखा लळा लावला.

लोकांची गंमत अशी असते कीं, कुणीं सावत्रपणा केला म्हणजे त्यांची जीभ चुरुचुरु चालते आणि एकादीनें सावत्रपणा असून खरी माया लावली तरीहि लोकांना तें कसेंसेंच वाटतें! मला वाटतें

लोकांना कुरकुरायला कांहीं तरी साधनच हवें असतें ! त्यांच्या करमणुकीच्या तबला-पेट्याच त्या !

पण त्या मायलेकींत जो जिव्हाळा निर्माण झाला, तो कुतूहल-पूर्ण होता. पण इतक्याहि चांगुलपणांत एक खोड निर्माण झाली होती.

ती काय ?

सिंधूला आपली खरी आई आठवत होती. आपली खरी आई आपल्या वडिलांजवळ कधीं फारसें बोलत नसे. आपले वडिलहि आपल्या पहिल्या आईशीं किंचित् कठोरपणानें वागत होते, असें तिला अलीकडे वाटूं लागलें होतें !

कां ?

कारण आतां आपले वडील नव्या आईशीं फार मोकळ्या मनानें बोलतात. सर्व खेळीमेळीचा व्यवहार दिसत होता तिला !

सिंधूला वाटे, अशा वागण्यानें आपली नवी आई आपल्या वडिलांचा अपमान करते आहे. तिला वाटे, आपली नवी आई आपल्या वडिलांची घ्यावी तितकी काळजी घेत नाहीं !

तिनें आपले हे विचार आपल्या वडिलांनाहि ऐकविले. तिचे वडील फक्त हंसले; पण त्यावर उत्तरादाखल कांहींच बोलले नाहींत !

तोहि तिला स्वतःचा अपमानच वाटला.

तिनें मनांत ठरवलें, "हरकत नाहीं. आपल्या वडिलांची काळजी आपण घेतली पाहिजे."

आणि तेव्हांपासून वडिलांना पाय धुवायला ऊन पाणी ठेवणें, त्यांचें संध्येचें मांडणें, वगैरे कामें ती दक्षतेनें करूं लागली.

पहिल्या आईच्या कारकीर्दींत तिनें कधींच कामाला हात लावला नव्हता !

उलटीं हिचींच कामें इतरांना करावीं लागत.

सिंधूला एक तीन वर्षांचा धाकटा भाऊ होता. सिंधूच्या आईला येवढीं दोनच मुलें झालेलीं होतीं ! सिंधूच्या पाठीवर बरींच वर्षें तिच्या आईला मूलच झालें नव्हतें. असें होतें !

सिंधूच्या वडिलांचें नांव होतें अण्णासाहेब. अण्णासाहेब हे एक व्यापारी होते. त्यांचा धंदा सराफीचा होता व तो त्यांना महिना दोन-तीनशें रुपये मिळवून देत होता.

* * * *

सिंधु डोळे मिटून पडून राहिली, आणि पांच मिनिटांनींच धाड्कन् दरवाजा उघडून अण्णासाहेब आंत आले !

सिंधूनें डोळे न उघडतांच आळसटपणानें विचारलें, " इश्श्, कोण आहे—?"

" मी आहे." हातांतील छत्री खुंटीला ठेवीत अण्णासाहेब म्हणाले.

" कोण अण्णा ! " सिंधु एकाद्या नागिणीसारखी तरारून उठली, " आणि हें काय, दाराशीं टांगा नाहीं वाजला तो ? "

अण्णासाहेब हंसत हंसत म्हणाले, " नाहीं केला, पायींच आलों आज. आतां ही हजार-दोन हजारांची हुंडी पटवायची आहे ना ? तेव्हां आतां टांग्याला पैसे खर्च करून कसें चालेल ?"

सिंधु चेष्टेनें मान एकसारखी हालवीत आणि हातवारे करतां करतां दरवाजाचा आश्रय घेत म्हणाली, " टांग्याचे चार आणेच दोन हजाराला कमी पडत होते होय ? " आणि ती असें कांहीं गोड हंसली—

तिचे ते सतेज, नाचरे डोळे— कुरळे केस— गौरवर्ण— वेताच्या काठीसारखी लवचिक देहयष्टि—

सगळें वर्णन करतां येईल; पण त्या सिंधूचे वडील—ज्य

वात्सल्यपूर्ण नजरेनें तिच्याकडे पाहून, तें अलड सौंदर्य पाहात होते— ती पितृवात्सल्याची दृष्टि तितक्या एकतानतेनें मला कशी रंगवतां येणार ?

वाचकांनीं कल्पनेनेंच रसास्वाद घ्यावा !

" बरं, चहा सांगणार का आतां करायला ? " अण्णा-साहेबांनीं विचारलें.

" चहाकरितां खर्च होणारे पैसे कमी पडणार नाहींत ना माझ्या लग्नाला ? "

सिंधु हें बोलली खरी; पण किती घाईनें ? 'वडलांना राग तर येणार नाहीं ना' ? या कल्पनेनें किती चाचरत बोलली ती !

आणि वर सफाई करण्याकरितां म्हणते कशी, " खरंच अण्णा, चहा अगोदर गार पाणी देऊं का ? तुम्ही येणार म्हणून मीं मुद्दाम तांब्याला फडकं लावून ठेवलं होतं आणि जाईचीं फुलं घातलीं आहेत त्यांत वासाला ! देऊं का थोडं ? "

आणि लगेच तांब्या घेऊन बापापुढें हजर !

आणि पुन्हा सुरुवात—

" खरंच अण्णा, टांगा काऽ हो केला नाहींत— स्टेशनवरून येवढ्या उन्हाचे पायीं आलांत ते ? "

" अग पोरी, आज टांगा मिळालाच नाहीं—जा, आधीं चहा सांग करायला—"

" पाणी तर घ्या आधीं—" असें म्हणून फुलपात्रांत पाणी ओतून तिनें वडिलांच्या हातांत ठेवलें. वडिलांनीं पुरें म्हटलें, तशी हातांतलें तांब्याफुलपात्रें संभाळीत, वडिलांच्यावर आपली दृष्टि कायम ठेवून, एक एक पाऊल मागें मागें टाकीत आणि दरवाजाजवळ आल्याबरोबर झटकन् गिरकी मारून, वळून ती झटकन् चहा सांगायला घरांत गेली !

आपल्याला वाटेल,–किती साध्या गोष्टींचें पाल्हाळिकपणानें वर्णन चालविलें आहे मी. पण– या साध्या–प्रसंगानेंच अण्णासाहेबांचा सर्व श्रमपरिहार झाला होता !

× × ×

त्याच दिवशींच्या संध्याकाळची गोष्ट. सिंधूच्या कानांवर आलें होतें, आपलें लग्न जवळ जवळ ठरल्यासारखें झालें आहे ! त्यामुळें तिला आनंद झाला नव्हता असें थोडेंच होतें ? पण लगेच तिच्या मनांत विचार आला; आपण लग्न होऊन सासरीं गेल्यानंतर आपल्या अण्णांची काळजी कोण घेणार ? तिला आपलें वाटत होतें; आपण इतक्या दिवस अण्णांची काळजी घेतली, आतां आपण सासरीं जाणार––

वेड्या मुली,–पण तिला वेडी तरी काय म्हणून ठरवायचें ? तिच्या मनाला एक तसली आढी पडली होती ! सर्व बाबतींत नव्या आईशीं जिव्हाळ्यानें वागणारी सिंधु, येवढ्या बाबतींत कुढ्या विचाराची बनली होती !

संध्याकाळ झाल्यामुळें सिंधूची नवी आई–सिंधूच्या धाकट्या भावाला घेऊन–देवाला गेली; पण अण्णासाहेब घरांतच होते.

अशी सुवर्णसंधि आपल्याला आजच्या आज मिळावी अशी सिंधूला तळमळ लागली होती !

आपला प्रकाशाचा पिसारा ओढून घेऊन सूर्य दिसेनासा झाला होता. कपाळीं मळवट भरल्याप्रमाणें क्षितिजाची कडा रक्तवर्ण रंगली होती. क्वचित् एकाद्या घरांत असलेल्या झाडावर चार-दोन पांखरें 'इथं बसूं ? तिथं बसूं ?' अशा प्रश्नार्थक वृत्तीनें वागडत होतीं !

अण्णासाहेब ईझीचेअरवर पडले होते; आणि समोरच वर वर्णिल्याप्रमाणें देखावा दिसत होता !

इतक्यांत अल्लडपणानें आपली चाहूल लागूं न देतां सिंधु अण्णासाहेबांच्या पाठीशीं जाऊन उभी राहिली.

अण्णासाहेबांना बिलकुल चाहूल लागली नाहीं.

अखेर चाहूल देण्याकरितां तिला मुद्दाम हंसावें व खोकावें लागलें. अण्णासाहेबांनीं चमकून मागें पाहिलें. ते जास्तच गंभीर झाले; समोर सूर्यास्ताचें चित्र, इकडे पाठीमागें मुलगी उभी. तिच्याच लग्नाचा ते विचार करीत होते; आपल्या घरांतला हा आनंदाचा प्रवाह—

तोंच त्यांना आपल्या गत पत्नीची आठवण झाली !

सिंधु म्हणजे आपल्या आईचीच छोटी प्रतिमा होती !

अण्णासाहेबांचे डोळे पाण्यानें भरून आले.

लगेच सिंधु लाडिवाळपणानें पण उदासीनतेनें हंसत पुढें झाली आणि ईझीचेअरच्या हातावर बसली.

“ अण्णा–”

“ काय वगड्या ?” अण्णासाहेब सिंधूला अगदीं प्रेमांत आले कीं, वगड्या म्हणून म्हणत.

सिंधु अण्णासाहेबांच्या सदऱ्याला गुंड्या घालूं लागली !

“ मला आज कसंसंच वाटतंय् ! ”

“ कसंसं वाटायला काय् झालं ? आतां चांगलं लग्न ठरवलं आहे—”

“ हं, म्हणूनच मला कसंसं वाटतंय् !”

“ चल्, वेडी आहेस झालं !”

“ असूं द्या, पण अण्णा, इतक्यांत कशाला हो माझं लग्न करतां ? राहीना आणखी एक-दोन वर्षं ! मला बाई तुम्हांला सोडून जायचं अशी कल्पना मनांत आली तरी सुद्धां रडायला येतं ! ”

“ अग, आतां तुला आपलं असं वाटतं आहे; पण लग्न होऊन एकदां सासरीं गेलीस म्हणजे मग माझी आठवणसुद्धां होणार नाहीं तुला ! ”

“ म्हणूनच म्हणतें कीं, इतक्यांत माझं लग्नच करूं नका ! ”

“ कां बरं ? मग केव्हां करायचं लग्न ? आणि लग्न ठरवलं, आहे तिथं काय सांगूं ? ”

“ खरंच अण्णा मी मुलगा असतें तर बरं झालं असतं नाहीं ? ” एकीकडे हातांच्या बोटांची चाळवाचाळव चालली होती !

“ म्हणजे काय झालं असतं ? ”

“ म्हणजे—मी खूप खूप शिकलें असतें– तुम्हांला कामधंद्यांत मदत केली असती ! आपला शरद् अजून किती तरी लहान आहे– तुम्हांला मदत करायला ! खरंच अण्णा, बरं झालं असतं नाहीं मी मुलगा असतें तर ? ” आणि अण्णांच्या सदऱ्यावरून हात फिरवीत ती म्हणाली, “ आणि माझ्याकरितां दोन हजार रुपयेहि खर्च करावे लागले नसते तुम्हांला ! उलटे मीच तुम्हांला मिळवून दिले असते ! ”

“ होऽ हो–असं झालं असतं खरंच; तूं मुलगा असतीस तर–”

“ मग मी आतां काय करूं ?–” खुर्चीजवळून बाजूला होत सिंधु म्हणाली.

“ काय करतेस ? ”

“ इश्श, तुम्हीं सांगा ना काय तें ! ’

“ आतां संध्याकाळ होऊन गेली आहे. हातपाय धुवून देवाला नमस्कार कर–”

“ आणि देवाला काय म्हणूं मला मुलगा कर म्हणून ? ”

“ चल, खुळचट–”

“ अण्णा—

" पुन्हा एकदां सांगतें हं; इतक्यांत माझं लग्न ठरवूं नका. मला अजून तुमच्याजवळ राह्यचं आहे— मी इतक्यांत सासरीं जाणार नाहीं—" आणि मान वेळींत वेळीत ती देवघरांत गेली; तिनें पाय धुतले, देवापुढें निरांजन लावलें. मनांत उडालेला भावनेचा गोंधळ तिच्या चेहऱ्यावर फारच उठावदारपणानें दिसत होता!

तिनें देवाला नमस्कार केला, तिच्या आईनें शिकविलेलें प्रार्थना-गीत म्हटलें आणि तरीहि ती तशीच उभी राहिली!

तोंच तिचा धाकटा भाऊ शरद् आणि आई तिथें आलीं.

आईनें हंसत हंसत विचारलें—

" कसली येवढी देवाची प्रार्थना चालली आहे? चांगला नवरा मिळावा म्हणून का?"

" माई—तूं आज थट्टा करूं नकोस हं माझी—" सिंधु आपल्या नव्या आईला माई म्हणत असे.

" कां हो—बाईसाहेब—?"

" मी आज चिडलें आहे—!"

" कुणावर?"

" मी माझ्या स्वतःवरच!"

" कां?"

" मला वाटलं म्हणून! अन् त्यांतून तूं माझी थट्टा केलीस तर रडायला येईल मला आज!"

" इतक्या कां लग्नाकरितां उतावळ्या झाल्या आहांत?"

" तूंच झाली आहेस माझ्या लग्नाकरितां उतावळी! माई-तूं आतां कांहीं बोलूं नकोस हं—मी चिडून कांहीं तरी उत्तर देईन—तूं जा आतां इथनं—"

माई तिथून जाण्याच्या ऐवजीं अण्णाच तिथें आले.

अण्णांच्याकडे पाहात माई म्हणाल्या "इकडे कां भूत आलें आहे आज?"

"तिला आज वाईट वाटत आहे. तिला वाटतं आहे आपण मुलगा असतों तर–"

"मीच जातें मुळीं आतां इथून–चालू द्या तुमच्या थट्टा!"

सिंधू तिथून निघून गेली.

× × ×

सिंधूचें लग्न नक्की ठरलें.

महिन्यानें मुहूर्त धरला होता.

सिंधूच्या घरीं नातेवाईक मंडळी लग्नाकरितां म्हणून अगोदर-पासून जमा व्हायला लागली होती!

घर रंगसफेतीनें शोभूं लागलें होतें.

घरांत नव्या नव्या जिनसा येत होत्या!

सिंधूहि आतां पूर्णपणें रंगली होती!

× × ×

लग्नाचा मुहूर्त आठ दिवसांवर आला होता.

× × ×

"घण्! घण्!! घण्!!!" कुठें तरी वाजूं लागलें, कीं आपला संबंध नसतांनाहि आपण चौकशी करतों कुठें वाजतें आहे आणि काय वाजतें आहे?

आणि चौकशीनंतर आपल्याला किती अनपेक्षित बातम्या कळतात!

एकाद्या वेळेला घासूनपुसून चक्क केलेली कांच लावलेल्या दिव्याला बसवतां बसवतांच हातांतून खळ्कन् गळून पडते आणि त्या कांचेच्या ठिकऱ्या होतात!

एकादे वेळीं दिवाणखान्याचें दार उघडें राहतें आणि कुठेंतरी एकादा मुलगा गोफणीनें कुठें तरी दगड फेकीत असतो; पण योगायोगानें आपल्या दिवाणखान्याच्या सहज उघड्या राहिलेल्या दरवाजांतून त्या गोफणीचा दगड आंत येतो आणि समोरच असलेला भिंतीवरचा मोठा बिलोरी आरसा खळ्‌कन् फुटतो.

एकादें पांखरूं डौलानें एखाद्या झाडावर बसतें; आणि अचानक कुठून तरी तीर येतो आणि तें पांखरूं घायाळ होऊन पडतें आणि बाकीचीं पांखरें उडून जातात तिथून !

हे असे योग कसे येतात ?

या योगायोगाला संदर्भ काय असतो ?

आणि असें चमत्कारिक अचानकच होतें तरी कसें ?

× × ×

आणखी चमत्कारिक आणि आश्चर्यकारक बातमी काय सांगणार ?

लग्नाला आठ दिवस राहिले आणि सिंधूला ताप आला आणि तोच आवांक्याबाहेर जाऊन, लग्नाला चार दिवस राहिलेले असतांना बिचारी सिंधु मरून गेली !!! सर्व समारंभ जागच्या जागेवर राहिले ! पांखरांसारखे जमा झालेले नातेवाईक पांखरांसारखेच निघून गेले !

आणि जखमी झालेले अण्णासाहेब आणि माई विषण्ण चित्तानें—त्या रिकाम्या दिवाणखान्यांत येरझाऱ्या घालूं लागले !

किती चमत्कारिक ?

पण इतका चमत्कारिक शेवट त्या परमेश्वरानें सिंधूच्या आयुष्याचा केला ! असें वाटतें—सिंधूच्या आयुष्याची ईश्वरानें लघुकथाच लिहिली होती काय ?

# यशवंत गोपाळ जोशी

हो, आतां सांगायला काय हरकत आहे? दोन-चार मासिकांत माझ्या गोष्टी छापून आल्या आहेत! अशा तऱ्हेनें माझ्या गोष्टींना 'वन्स-मोअर' मिळाल्यानें त्या 'पॉप्युलर' झाल्या, असें इतर कुणाला वाटलें नाहीं तरी मला वाटणें निसर्गप्राप्त नव्हतें काय? आणि तसें मला वाटलेंहि. माझ्या मित्रमंडळींनाहि तसेंच वाटलें असें ते म्हणत. त्यांच्या या म्हणण्याबद्दल मला क्वचित् शंका येई. कारण एखाद्याला मीं विचारावें कीं, "काय हो, माझी परवांची गोष्ट कशी काय होती?"

तो झटकन् उत्तर देई, "वाः! अरे, मराठी वाङ्मयांत अशी गोष्ट गेल्या दहावीस वर्षांत प्रसिद्ध झालेली नाहीं! पाश्चात्य लेखकांत एका 'ओ हेन्री'खेरीज अशा गोष्टी कोणीच लिहीत नाहीं!"

हें ऐकल्याबरोबर सतत तीन महिने कॉड्लिव्हर ऑइल घेऊन माझ्या शरिरावर जो परिणाम झाला असता तितका परिणाम माझ्या शरिरावर एक मिनिटांत झाला!

पण लगेच दुसऱ्या क्षणीं मला एरंडेलहि घ्यावें लागणार होतें याची मला त्या क्षणाला कल्पना आली नाहीं! कारण, आमच्या मित्रवर्यांनीं माझ्या गोष्टीची म्हणून स्तुति पुढें चालू ठेवली; पण–पण–माझी गोष्ट म्हणून तो ज्या गोष्टीची स्तुति करीत होता ती गोष्ट माझी नव्हती. ती 'खांडेकरां'ची गोष्ट होती!

दुसऱ्या कांहींना मीं माझ्या गोष्टीबद्दल मत विचारलें, कीं ते म्हणत, "वा! अरे, त्या गोष्टीबद्दल काय विचारतोस–परवां आमच्या मित्रांच्या बैठकींत बराच वेळ बोलणं झालं तुझ्या गोष्टीसंबंधानं!"

बस्स, खलास! काय बोलणें झालें तेवढेंच सांगायचें ते टाळीत–मग मीहि 'ते कांहीं तरी चांगलेंच बोलले असतील' अशी कल्पना करून घेई आणि मी आपला खुषीत असे!

परवां माझ्या सर्व मित्रांनीं कट केला आणि ठरवलें, कीं 'मी एक उत्कृष्ट लघुकथालेखक आहे!' पण या त्यांच्या 'ठरवण्या'वर शिक्कामोर्तब होण्याकरितां एका गोष्टीची आवश्यकता होती. आणि त्या गोष्टीबद्दल मला पंधरा-वीस रुपये भूर्दंड येणार होता! पंधरा-वीस रुपये त्यांना फीस्ट देण्यांत जर मीं खर्च केले तरच मी उत्कृष्ट लेखक ठरणार होतों!

मग मींहि मनांत विचार केला–अनायासं लेखक झालोंच आहे. तेव्हां उत्कृष्ट कां न ठरा? जिवाचा धडा करून पंधरा रुपये कर्ज काढलें आणि केली फीस्ट!

फीस्टमध्यें तयार केलेले पदार्थ जितके गोडीला होते त्याच्या चौपट गोड माझी स्तुति माझ्या मित्रांनीं चालविली होती! ती अमृतमय स्तुति पिऊन मी इतका पाण्यापेक्षां पातळ होऊन गेलों होतों, कीं आतां फक्त हवेंत उड्डाण करायचें तेवढें मीं बाकी ठेविलें होतें!

अखेर शेवटीं फीस्ट संपली. स्तुति संपली. माझे सर्व मित्र माझ्या खोलींतून निघून गेले आणि आत्मस्तुतीची भांग पिऊन झिंगलेला मी ईझीचेअरवर आडवा झालों! माझ्या डोळ्यांसमोर वाङ्मयबाजाराखेरीज कांहींच दिसत नव्हतें. तो यशवन्त—तो रत्नाकर—तें चित्रमयजगत्—ती स्फूर्ति—

पण इतक्यांत आमच्या वडिलांचे एक स्नेही मजकडे येतांना

दिसले, तेव्हां मी थोडासा ताळ्यावर आलों. एकवार वाटलें, कीं हेहि कदाचित् माझ्या लेखनाची स्तुति करायलाच माझ्याकडे आले असतील; पण——

ते आले; एका खुर्चीवर बसले आणि हातांतील काठी टेबलाला टेंकून ठेवीत ठेवीत माझ्याकडे पाहात म्हणाले, " तुम्ही काय म्हणे हल्लीं लेखक झालां आहांत ? "

वरील वाक्यांतला 'लेखक' हा शब्द त्यांनीं इतक्या खवचट-पणानें उच्चारला, कीं त्यांनीं मला एखादी शिवी दिली असती तरी मला कांहीं वाटलें नसतें, इतकें लेखक म्हटल्यानें वाटलें ! त्यांना बहुतेक म्हणायचें होतें, 'तुम्ही काय म्हणे हल्लीं गाढव झालां आहांत !' पण केवळ सभ्यतेकरितां त्यांनीं 'गाढव' शब्दावर 'लेखक' या शब्दाची शाल टाकली असावी !

" हें बघ, केवळ तूं गोपाळरावांचा मुलगा म्हणून मी चार शब्द तुझ्याशीं बोलणार आहे. शान्तपणं ऐकून घेण्याची इच्छा असेल तर सांग, नाहीं तर मी आपला आलों तसा जातों ! "

माझ्या डोळ्यांवरची स्तुतीची निशा खाड्कन उतरली ! मीं त्यांच्याकडे आदरानें पाहात म्हटलें, " काय बोलायचं असेल तें खुशाल मोकळ्या मनानं आणि हक्कानं बोला, माझे वडील हयात नाहींत, आपण माझ्याविषयीं आस्था बाळगीत आहांत याबद्दल कुणाला वाईट वाटेल ? हं, बोला काय बोलायचं आहे तें—मी अगदीं शान्तपणानं ऐकून घ्यायला तयार आहे."

" बरं तर मग इथं नको—मी जें म्हणणार आहें तें तूं एकट्या-नंच ऐकावंस अशी माझी इच्छा आहे. तुझ्याकडे होय-नव्हे कोणी तरी येणारच. चल, आपण गांवाबाहेर कुठं तरी फिरायला जाऊं ! "

आम्ही दोघेहि बाहेर पडलों.

× × ×

ती वेळ रात्रीं आठ-साडेआठची होती. बराच वेळपर्यंत आम्ही दोघेहि एकमेकांशीं बोललों नाहीं. पण थोड्या वेळांतच माझ्या वडिलांचे स्नेही आकाशाकडे पाहात म्हणाले, " वा ! शुक्राची चांदणी काय तेजस्वी दिसते आहे ? "

मी आकाशांत कुठें तरीच पाहात म्हटलें, "कुठं, कुठं पाहूं?"

वडिलांचे स्नेही म्हणाले, " हा गाढवा ! शुक्राची चांदणी कुठं आहे तें तुला माहीत नाहीं ! अरे, तुझ्या लेखनांत शुक्राच्या चांदणीची उपमा हरहमेश येते—आणि ती चांदणी तूं अद्याप पाहिली नाहींस ? आहेस खराच कल्पनावीर ! "

× × ×

पुढें ते आणि आम्ही गांवाबाहेर एका बाजूला जाऊन बसलों. ते म्हणाले—ते पुष्कळच म्हणाले, पण तें सर्व आतां मला जशाचें तसें सांगतां येणार नाहीं ! जी आठवण आहे ती संवादांत न देतां त्यांनीं मजपुढें व्याख्यान दिलें अशीच कल्पना करून लिहितों.

ते म्हणाले—

" तुम्हा लेखकांना पहिल्यांदा हात जोडून जर कांहीं विनंति करायची असेल तर ती म्हणजे, खरं बोलायला शिका ! थापा नकोत, खरं लिहा ! ती तुमची कला—टेक्निक् थोडं कमी झालं तरी चालेल; पण खरं बोला ! अरे बेट्यांनो, ज्या गोष्टी तुम्ही सामाजिक गोष्टी म्हणून लिहितां, तो तुमच्या सामाजिक गोष्टींत सामावलेला समाज आहे कुठं ? म्हणून जर तुमचा कान धरून विचारलं, तर तुम्हांला तें सांगतां येणार नाहींच; पण कोलंबसाचा बाप जरी स्वर्गांतून खालीं आला तरी तुम्ही रंगवतां त्या समाजाचा

थांगपत्ता लागायचा नाहीं ! तुम्ही लेखक म्हणजे अत्यंत पाजी आहांत ! सत्यसृष्टींत जितकीं पापं झालीं नाहींत त्याच्या दसपट पापं तुम्ही आपल्या कल्पनेनं निर्माण केलीं आहेत ! तुमचा खरा उपयोग जर कुणाला होत असेल तर तो चोर—जार—ठग यांनाच ! कारण नाविन्य दाखविण्याच्या मोहानं चोरांना, जारांना, ठगांना उपयोगी पडतील असेच प्लॉट्स तुम्ही आपल्या डोक्यांतून काढतां ! काय समजलास ? ”

मी काय समजायचें तें समजून चुकलों होतों !

“ बरं, तुमचीं हीं नवीन थेरं आम्हां जुन्या खोडांना पटायचीं नाहींत—आणि तुमचे विचार आणि वागणूक चांगली आहे असं समजावं तर तेंहि पटत नाहीं ! कारण सुंदर फूल देणारं झाड जसं बहुधा भरदार असतंच, त्याप्रमाणं सुंदर विचारांचे फवारे सोडणारे लेखक हाडामांसानं ( सौंदर्यानं म्हणत नाहीं ! ) रुबाबदार असायला पाहिजे होते. पण तुमचे सर्व अलीकडच्या पिढींतले लेखक जर ओळीनं उभे केले तर तीं बहुतेक पाप्याचीं पितरं पाहून मनाला इतकी शिसारी बसेल कीं, त्या सर्वांना एकदम पहाणारांना तीन दिवस जेवण जाणार नाहीं ! ”

“ हो, अलीकडे आणखी लेखकांच्या मताची मिजास सांगितली जाते. माझं मत असं आहे, माझं मत तसं आहे ! पण मी म्हणतों, तें मत जरी मूर्खपणाचं असलं तरी संभाळण्याची ताकद कुठं आहे तुम्हां लेखकांत ? एखाद्या मनांत भरणाऱ्या स्त्रीचं बाहुलं जर नुसतं तुमच्या डोळ्यांसमोरून चारपांचदा फिरवलं तर तुमची असलेलीं सर्व मतं साफ होऊन जातील ! एखादा धारिष्टवान त्याहि अग्निदिव्यांतून सहीसलामत मतासकट निसटला तर त्याला धरून पांच मुस्कडांत मारा—मतं साफ त्याचीं ! सांगाल तीं मतं पोपट बोलायला लागेल ! ! तुम्हां लेखकांत कांहीं कांहीं नुसते ब्लॉटिंग

पेपर्स आहेत ! विलायती विचार टिपायचे, आणि त्यांचे आपल्या मनावर जे कांहीं उलटेसुलटे संस्कार होतील ते नीटनेटके छापून 'नव्या मनूची भगवद्गीता' म्हणून विकीत सुटायचे ! "

मला आतां दम लागला होता !

" एका विशिष्ट अर्थानं म्हणतों आहे मी. तुम्हां लेखकांना चारित्र्य—तपश्चर्या या अर्थानं—अजिबात नाहीं ! लोकांना आवडेल तें तुम्ही लिहिणार ! मग तुमची 'लेखक' ही उच्च भूमिका राहिली कुठं ? स्वातंत्र्य, समता या चांगल्या नांवांखालीं तुम्ही लफंगेगिरी चालविली आहांत ! सतरासतरा—अठराअठरा वर्षांचीं कार्टीं कवि म्हणून 'प्रियेचीं विरही गीतें' म्हणत हिंडत आहेत ! पूर्वींच्या बालविवाहांना व तेरा वर्षांच्या मुलीला मूल झालं तर 'काय हें क्रौर्य' म्हणून तुम्ही ओरडतां— खरं आहे तुमचं म्हणणं. पण या लेखकांच्या वयाकडे, ज्ञानाकडे पाहून यांची ही वाङ्मय-प्रजा अगदींच कोंवळेपणाची आहे याची नाहीं कांहीं शरम वाटत तुम्हांला ? हं, बोलूं नकोस मधें— अपवादांनीं माझ्या म्हणण्याला उत्तर देण्याचा प्रयत्न करूं नकोस. एखादा बाल-कवि असेल जन्म-जात—अरे, पण हीं स्वर्गींचीं फुलं कपिलाषष्ठीच्या मुहूर्तावर उगवायचीं आणि विजेसारखीं चमकून जायचीं ! त्यांच्याबद्दल कोण आक्षेप घेणार ! कांहीं लेखक मला असे भेटले आहेत, कीं त्यांना सिगारेटच्या धुराचा एनिमा घेतल्याशिवाय लेखनाचे रेच होतच नाहींत मुळीं ! काय रे, तूं ओढतोस कीं नाहीं सिगारेट्स वगैरे ? "

मी लाजेनें मान खालीं घातली !

" लेखन ही तपश्चर्या पाहिजे—मग तें साहित्य कोणत्याहि जातीचं असो. भरली पोरगी मनांत, कर तिच्यावर काव्य ! आला

एखादा मनांत वेडाविद्रा विचार, म्हण त्याला ध्येय ! हा लेखन-कलेशीं केलेला नुसता व्यभिचार आहे ! हे कसले लेखक ! लोकांच्या फुरसतीशीं नटवेपणानें लघळपणा करणाऱ्या या सर्व वारांगना–आणि म्हणे लेखक !" तो गृहस्थ विक्राळपणानें हंसला.

मला त्या गृहस्थाच्या बोलण्याची भयंकर चीड येत चालली होती; पण त्या बोलण्यांत सहृदयपणा दिसत होता, अंतःकरणाची तळमळ दिसत होती, खराखुरा जिव्हाळा दिसत होता !

" अरे बाबा, ज्या लिहिण्यांत पावित्र्य नाहीं– सगळा थिल्लर-पणा आणि हुच्चपणा ! आणि काय विनोद ! अहाहा ! पहिल्या गृहस्थानं विनोद करण्याकरितां जीभ बाहेर काढली, दुसऱ्यानं त्याच्यावर कडी करण्याकरितां जीभ बाहेर काढून दांताड विचकलं, तिसऱ्यानं हें सर्व करून दोन्ही हातांनीं आपलेच कान ओढून धरले आणि पांचव्यानं आपले केस कपाळावर ओढून घेतले, आणि लागले आपले आपणच अच्यावच्या हंसायला ! ! तें जाऊं दे, मला त्यांच्याशीं काय करायचं आहे ? माझं बोलणं तुझ्यापुरतं आहे ! लिहिल्याशिवाय राहवत नाहीं तें लेखन ! लिहायला बसतांना–देवाच्या पूजेला बसल्यासारखा मनाचा उल्हसितपणा पाहिजे ! लेखनाच्या जागेंतसुद्धां पवित्रंपणा पाहिजे ! इथं माझी टर उडवशील तूं ! पण बाबा रे, पवित्रपणा पाहिजेच पाहिजे ! नुसतं अमका लेखक टांकानं लिहितो– आण तसलाच टांक, तो गुलाबी कागदावर लिहितो–आणले गुलाबी कागद ! सब झूट आहे ! लेखक म्हणजे चांगल्या विचारांचा मार्गदर्शक दिवा असला पाहिजे ! तो मार्गदर्शक ठरण्याच्या लायकीचा पाहिजे ! नुसतं काड्या-मोड्याचं औत असतां कामा नये तें ! असं कांहीं करायचा विचार असेल तर लेखक हो, नाहीं तर टाक लेखणी हातची ! "

मी विचार करूं लागलों !

" कल्पनासृष्टि पाहिजेच पाहिजे; पण बेट्यांनो, सत्यसृष्टीकडे कधीं तरी पाहात जा ! सगळ्या स्वर्गांतल्या गोष्टी ! आतां गंमत पाहा, इतरांची कशाला— तुझीच सांगतों मी:— हाच जर तुझ्याशीं इतर विषयांवर माझा कांहीं संवाद झाला असता तर त्याचा तूं कुठं ना कुठं तरी लेखनांत उपयोग करून घेतला असतास; पण—मी आतां जें बोललों याच्यांतलं एक अक्षर तरी लिहिण्याबोलण्याचं धाडस होईल का तुझ्याकडून ? "

मीं त्यांना साष्टांग नमस्कार घालीत म्हटलं, " तुम्ही आतां जें कांहीं म्हणालांत तें सर्व जसंच्या तसं लिहितों आणि वर आणखी माझं नांव छापतों; मग आणखी आहे का कांहीं म्हणणं ? "



# विडी आणि काडी

बरेच दिवसांनीं ते दोघे आज एकमेकांना भेटले होते.

'कसं काय? —ठीक आहे!' वगैरे ठराविक प्रश्नोत्तरें झालीं. पुढें काय बोलावें हा प्रश्न दोघांनाहि पडला होता. त्या रस्त्यावरील दुकानांकडे ते पाहूं लागले. समोरच्या बाजूला 'विश्राम-धाम' या नांवाचें एक टोलेजंग हॉटेल होतें. त्या हॉटेलकडे दृष्टि जातांच दोघांनाहि कांहीं गोड आठवणी आठवल्या; आणि त्यांनीं एक-मेकांशीं बोलायचें सोडून दिलें व त्या हॉटेलकडेच पाहात ते उभे राहिले.

त्या हॉटेलांत गिऱ्हाइकांची रहदारी एक सारखी चाललेली होती. गिऱ्हाइकांच्या खिशांतले पैसे त्या हॉटेलच्या मॅनेजरच्या टेबलावर एक सारखे पडत होते. खरा का खोटा हें पाहण्यासाठीं त्यांतील रुपया मॅनेजर टेबलावर खणूकन् वाजवून घेई आणि मोड देई!

किती साधें दृश्य! पण तें पाहूनच दोघांच्या डोक्यांत मोठी खळबळ उडाली. त्यांतील एकानें दुसऱ्याचा हात धरला आणि राहिलेला मोकळा हात त्याच्या खांद्यावर टाकीत, आशाळभूत-पणानें म्हणाला, "किती दिवसांत गेलों नाहीं रे आपण दोघे मिळून हॉटेलांतून?"

'हंऽ!' असें म्हणून दुसऱ्यानें सुस्कारा सोडला आणि म्हटलें, "पण आपण जेव्हां जोडीनें जात होतों तेव्हां 'दोन इसम नऊ आणे' ह्याच्याखालीं हॉटेलांतील पोऱ्याला कधीं ओरडावें लागलें नाहीं?"

"पण—लेका, आतां सिंगल चहाला महाग झालों आहोंत ना! चल, देना लेका चहा—"

इतक्यांत हॉटेलांतील पोऱ्याचें ओरडणें रस्त्यावर ऐकूं आलें—

"अर्धी प्लेट आइस्क्रीम आणि—चार मठ्ठा!"

ती ऑर्डर ऐकून बाहेर त्या दोघांच्या तोंडाला पाणी सुटलें; पण करतात काय! अखेर त्यांतलि एकानें आळस झाडला, डोक्याची टोपी काढून घाम पुसला आणि तो आशाळभूतपणानें म्हणाला—




"लेका विडी तर काढ असली एखादी तर."

दोन्ही खिशांत हात घालून तितकाच उग्र चेहरा करीत दुसरा म्हणाला, "ेरे, विडीला सुद्धां महाग झालों आहे हल्लीं."

" बरं तर; जातों तर मग— माझ्याहि खिशांत विडी नाहीं आणि पैसाहि—"

" नाहीं ! ! ! चला जाऊं या तर मग आतां ! "

दोघं दोन बाजूनें चालूं लागले ! !

दोघेहि एकमेकांपासून बरेच लांब गेल्यानंतर, प्रत्येकानें मागें वळून पाहिलें आणि एकमेक एकमेकांना दिसत नाहींत अशी खात्री झाल्यानंतर प्रत्येकानें आपल्या खिशांतील विडी काढली आणि जवळच्या पानपट्टीवाल्याच्या दुकानांत अडकविलेल्या सार्वजनिक काड्याच्या पेटीच्या डबड्यावर ती पेटवून, धुराचे फवारे सोडीत ते आपआपल्या इच्छित स्थळीं गेले !

× × ×

वर उल्लेखिलेले नंबर एक व नंबर दोन हे कांहीं वर्षांपूर्वी 'विश्राम-धाम' या सुप्रसिद्ध हॉटेलाशेजारींच असलेल्या एका दुकानांत नोकरीला होते. वास्तविक त्या नोकरींतीलच त्या दोघांची ओळख; पण कोणीहि कपटभावानें कधीं वागला नाहीं, असे ते दोघे मनमोकळे, पण आनंदी प्राणी होते. आठ-दहा वर्षें ते त्याच दुकानांत नोकरीला होते, पण पुढें धंद्याची मंदी व जुने नोकर म्हणून त्यांचा वाढलेला पगार, यांचा विचार करून मालकानें त्या दोघांनाहि नोकरीवरून कमी केलें आणि कमी पगाराचे नवे नोकर दुकानांत ठेवले ! अर्थात् इथून पुढें ते दोघेहि फुटले. नंतर प्रत्येकजण हंगामी कुठें तरी नोकरीला राहात, चार-सहा महिन्यांत नोकरी सुटण्याची प्रत्येकावर पाळी येई, असें त्यांचें आयुष्य रखडत चाललें होतें. त्यामुळें ते पूर्वीचे मनमोकळे स्नेही 'सिगारेट'-वरून 'विडी'वर आले होते— आणि 'दोन इसम नऊ आणे' या ललकारीशिवाय जे ते मित्रद्वय हॉटेलांतून बाहेर पडत नव्हते

ते दुसऱ्याला दिली तर एक बिडी कमी होईल या काटकसरीच्या भावनेनें एकमेकांना बिडी देण्याचें टाळीत होतें !

आणि, मग त्यांच्या खोखोचा डाव सुरू झाला. एका भेटीला नंबर एकानें विचारावें,'अरे बिडी काढ', कीं लगेच दुसऱ्याचा नकार.

मग दुसऱ्या भेटीला दुसऱ्यानेंच पहिला बोलण्याच्या अगोदर म्हणावें, 'अरे बिडी काढ', कीं पहिला झट्कन 'नाहीं' म्हणे. आणि हीच उलट-पालट नेहमीं चालू झाली !

प्रत्येकाला वाईट वाटे, "अरेरे ! या हलाखीमुळें बिडीसुद्धां दोघांना एकदम ओढतां येऊं नये ना ?"

× × ×

गोष्टीच्या या मधल्याच पॅरिग्राफांत ओरडून घेऊं का समाजाच्या आणि रूढीच्या नांवानें ? पण नको ! नको ! ! मना ! ! ! मन आंवर ! या गोष्टींत सुन्दर तरुणी नाहीं आणि लग्नाचा विषय नाहीं ! ! तेव्हां ही भलतीच बडबड इथें काय कामाची ?

× × ×

नंतर बरेच दिवसांनीं ते पुन्हा एकत्र भेटले.

ते कुठें ?—

अगदींच अपरिचित अशा एका दुकानांत ! त्या दुकानदाराला एक नोकर ठेवावयाचा होता. ही बातमी दोघांनाहि परस्पर कळली होती, तरीहि ती त्यांनीं एकमेकांना निरोपानें कळविली. आणि योगायोगानें ते एकाच वेळीं त्या दुकानांत येऊन हजर झाले !

मनुष्यस्वभावाच्या अनंत लहरी या अशा कांहीं विचित्र असतात कीं. त्यांची कल्पनाच करतां येणार नाहीं !

दोन बेकार एकमेकांना 'नोकरी' मिळण्याचीं ठिकाणें प्रामा-

णिकपणानें सांगू शकतात; पण खिशांतील एक विडी कमी होईल या भीतीनें ते एकमेकांना चुकवून विड्या ओढतात !

ते त्या दुकानांत आले त्या वेळेला त्या दुकानाचे मालक बाहेर गेले होते. दुकानांतील एका इसमानें त्यांना मालक येईपर्यंत बसायला सांगितलें.

दोघे बाहेरच्या बाकावर आपल्या नव्या धन्याची वाट पाहात बसले.

किती अंग चोरून ! किती कुचमलेले ! किती दनिवाण्या चेहऱ्यानें ते तिथें बसले होते म्हणतां !

पांच-दहा मिनिटें गेलीं अशींच ! अखेरशेवटीं नंबर एकनें अगदीं घोगऱ्या आवाजांत एक बोट पुढें करून विचारलें, "असली तर काढ ना एकादी !"

ओठांची चुंबळ करीत नंबर दोन म्हणाला, "नाहीं रे एक सुद्धां !"

नंतरचा अर्धा-एक तास त्यांनीं दुकानांत काम करीत असलेल्या माणसांकडे अधाशीपणानें पाहात काढला. त्यांच्या मनांत येई, 'या दुकानांत आपल्याला असें काम करायला मिळेल का !'

नंतर दोघांनींहि लांबसे सुस्कारे टाकले !

जवळजवळ तास मध्यें गेला.

आतां दोघांनाहि विड्या ओढण्याची भयंकर हुक्की आली होती. त्या दोन्ही चोरांच्या खिशांत विड्या होत्या—पण–पण त्या त्यांना ओढतां येत नव्हत्या !

प्रत्येकजण आपल्या खिशांत हात घालून खिशांतल्या खिशांत विडी चाचपीत होता !

दोघांनींहि आवंढे गिळले.

अखेरशेवटीं पहिल्यानें आपल्या खिशांतील जिनसांची खानेसुमारी करण्याचा आव आणला. त्यानें पहिल्यांदा खिशांतला मळकट हातरुमाल बाहेर काढला. नंतर चार आण्यांचा गॉगल पेटीसकट बाहेर काढून, त्याच्या कांचा पुसल्या, नंतर सिनेमांच्या जाहिरातींच्या घड्या आणि नंतर खिशांतल्या खिशांत मोडलेल्या विड्यांचा चुरा !

आणि नंतर त्यानें एक कागदाची घडी बाहेर काढली. त्या घडीकडे त्यानें उत्सुकतेनें दोन मिनिटें पाहिलें आणि नंतर आश्चर्यचकित होण्याकरितां त्यानें ती कागदाची घडी उलगडली आणि पाहतो तों काय-- त्यानेंच मुद्दाम त्या घडींत घातलेली विडी त्याच्या दृष्टीस पडली !

" अरे, एक विडी आहे कीं ! " आनंदानें उसळून तो म्हणाला, आणि लगेच सुतक्यासारखा चेहरा करून ती विडी दुसऱ्यापुढें करीत तो म्हणाला, " एकच विडी आहे—ओढ कीं, तूंच—! "

तितकाच आंबट चेहरा करीत दुसऱ्यानें नकार दर्शविला ! तो हातांचीं बोटें चुरगाळूं लागला. त्यानें एकदां सपाटून आळोखेपिळोखे दिले आणि हनुवटीला आश्चर्यानें बोट लावीत म्हणाला, " माझ्याहि खिशांत एकादी सांपडली तर पाहतों ! "

आणि नंतर बरेंचसें ॲक्टिंग केल्यानंतर त्याच्या खिशांतील अनेक विड्यांपैकीं एक बिडी संशोधन करून सांपडल्याप्रमाणें त्यानें बाहेर काढली. " मला वाटलंच—एकादी तरी सांपडेल म्हणून !" नंतर त्या विडीचें सुटलेलें सूत तो पिरगाळूं लागला.

पण, लगेच पहिला म्हणाला, " लेका, विड्या सांपडल्या; पण काडेची पेटी कुठें आहे ? " पुन्हा दोघांनींहि ॲक्टिंग केलें !

नंतर दुसऱ्यानें खिशांत हात घातला आणि खिशांतून काड्याच्या पेटीचें फक्त झांकणच बाहेर काढून तो म्हणाला, " नुसतं खोकं आहे, काडी नाहीं ! " त्याच्या हातांतील रिकामें खोकें पाहून

पहिला म्हणाला. " खोकं आहे ना– मग काडी सांपडेल एकादी माझ्या खिशांत ! "

नंतर हें बाहेर काढ-- तें बाहेर काढ– पुन्हा सगळें खिशांत टाक, असें बंड करून त्यानें एक काडी बाहेर काढली.

दोघांहि लुच्चांच्या खिशांत खोके आणि काड्या होत्या; पण, काटकसर ! ! पेटी हरवूं नये म्हणून अलीकडे दोघेहि नुसतें वरचें खोकें आणि सुट्या काड्याच खिशात ठेवीत असत !

" ए, पण एकच काडी आहे हं–तिच्यांत दोन्ही विड्या पेटल्या पाहिजेत ! ये असा जवळ ये ना–"

तो अलगदपणानें त्याच्याजवळ सरकला. दोघांनींहि आपल्या तोंडांत विड्या धरल्या. एकानें हातांचा आडोसा करून काडी पेटविली. दोन्ही विड्या



पेटल्या गेल्या आणि विडीचा पहिलाच झुरका तोंडांत असतांनाच–

त्यांचें लक्ष समोर गेलें !

'हरे राम !'

त्या दुकानचा मालक ऐटीनें पावलें टाकीत दुकानांत येत होता.

आतां बिडी ओढणें कसें शक्य होतें ?

एकानें हातांतल्या हातांत बिडी विझविली. किंचित्सा हात भाजल्यामुळें त्यानें थोडीशी जीभ बाहेर काढली आणि विझलेलें थोटुक परत खिशांत टाकलें !

आणि दुसऱ्याला येवढें भानच राहिलें नाहीं !

त्यानें चटकन बिडी खालीं टाकली.

आपल्या पायांतल्या वाहणेनें ती विझविली आणि त्या विझलेल्या बिडीवरच उभे राहून दुकानांत शिरत असलेल्या मालकाला नमस्कार करून तो म्हणाला. " आपल्या दुकानांत एका इसमाची जरूरी आहेना ? "



# देशभक्ति आणि मॅग्निशिया !

पंडित जवाहिरलाल यांना पकडलेल्या दिवसाची गोष्ट. गांवांत सर्वत्र हरताळ पडला होता. आमचे गांवांत संध्याकाळीं युवक-मंडळाची सभा होती. सभेला समाज बराच लोटलेला होता. अनेक युवकांनीं ज्वलज्जहाल भाषणें केलीं. टाळ्यांचा गजर एक-सारखा चालू होता. पुष्कळशा तरुण विद्यार्थिनीहि आलेल्या होत्या. त्यामुळें बोलणाऱ्या वक्त्याला साहाजिकच जास्त हुरूप येत होता !

सरते शेवटीं श्रीकान्त चंद्रचूड प्रचंड गजरांत बोलण्यास उभे राहिले. त्यांनीं कॉलेज-बहिष्काराच्या चळवळींतच कॉलेज सोडलें होतें. त्यांचीं तत्त्वें फार तेजस्वी होतीं; इतकी कीं. तीं कित्येकांना कळतहि नव्हतीं !

त्यांनीं आजन्म अविवाहित राहण्याची प्रतिज्ञा करून आज तीन वर्षें झालीं होतीं ! त्यामुळें त्यांच्या देहाची जितकी खराबी होणें शक्य होतें तितकी झालेली होती ! डोळे जाग्यावर दिसत नव्हते म्हणून खुणेकरितां डोळ्यांच्या जागीं त्यांनीं चष्मा लावून ठेवला होता ! दाढीची साफसुफी रोजचीच होत असल्यामुळें माळरानावरील एकरंगी पांढऱ्या मशिदीची भेसूर तेजस्विता त्यांच्या चेहऱ्यावर सदैव असे !

श्रीकान्त टाळ्या थांबल्यावर बोलूं लागले, “भारताच्या तरुण सुपुत्रांनो, ही वेळ तुमच्याकरितां आलेली आहे. स्त्री-दास्य विमो-चन, अस्पृश्यता यांना आपण आग लाविली पाहिजे ! आपल्या

नवविचारांचा ज्वालामुखी आतां आपण जागृत केला पाहिजे ! जात-धर्म—कुळ-गोत—देव-दैव सब झूट आहे ! या जगांत देव नाहीं ! ( टाळ्या ). धर्म नाहीं ( टाळ्या व शिट्या ). चातुर्वर्ण्य हें जर भगवद्गीतेंत सांगितलें असेल तर त्या भगवद्गीतेलाहि मी लाथे-खालीं तुडवीन!" ( टाळ्या, शिट्या, बेंडबाजा, ताशा, वाजंत्री आणि बॅंड. )

सभा संपली.

आज जो तो श्रीकान्त चंद्रचूडांच्या ओजस्वी वाक्पटुत्वाची स्तुति करीत होता ! कोणी म्हणत होते कीं, 'हा नरपुंगव महा-राष्ट्राचा लेनिन आहे.' कोणी म्हणत, 'हा महाराष्ट्राचा कमाल-पाशा आहे !' कोणी म्हणत, 'हा महाराष्ट्राचा कार्ल मार्क्स आहे !'

खरं म्हणाल तर मला त्यांतलें कांहींच कळत नव्हतें ! पण त्या चंद्रचूड महात्म्याची ओळख करून घेण्याची मला अनिवार जिज्ञासा झाली !

मला वाटे, तो महात्मा माझ्याशीं बोलेल का ? माझ्याकडे पाहील का ? माझें शंका समाधान करील का ?

एक दिवस त्यांजकडे जाण्याचा मीं धीर केला. मला ते भेटले. मला मनुष्य हाडाचा गरीब वाटला. माझ्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीं देण्याचे अगोदर ते मलाच प्रश्न विचारूं लागले !

सर्व नवविचारांच्या त्या अप-टु-डेट डिक्शनरीपुढें मी म्हणजे इन्फंटचें प्रायमर आहे असें मला वाटलें; आणि मी अडखळत बोलूं लागलों.

त्यांनीं मला विचारलें, "सामाजिक समता-विषमता याबद्दल आपलं मत काय आहे ?"

त्यांच्या त्या ओजस्वी 'आवाजा'ला ऐकून मी थोडा नरमलोंच ! मी नरमाईनें म्हणालों, "साहेब, मी ब्राह्मण असलों तरी

मागसलेला आहे ! I am a backward Brahmin. माझ्या कल्पना पूर्वग्रहदूषित आहेत ! मला वाटतं, एखाद्या माणसाचा बाहेर सर्व ठिकाणीं अपमान झाल्यानंतर जसा तो सत्तेच्या बायकोशीं वितंडवाद करीत घरांतलींच गाडगीं-मडकीं फोडूं लागतो त्याप्रमाणें सर्व नवजवानांचे आहे ! राजकीय क्षेत्रांत हमरी तुमरी घालण्याची ज्यांची हिंमत नाहीं ते— देव झूट आहे, धर्म झूट आहे —स्पृश्यता नको—अस्पृश्यता नको वगैरे ध्येयवाद बडबडतात ! अहो, आतां 'आपल्यासारख्यांना' माणसं म्हणायची रूढि पडलेली आहे ना तीसुद्धां कांहीं दिवसांनीं हे कबूल करावयाचे नाहींत ! 'आम्ही माणसं नाहींत' हें ठरविण्याची शेवटची सत्याग्रहाची मोहीम होणार बहुतकरून ! साहेब, तें कांहीं नाहीं, मला आपला शिष्य बनवा !"

माझे भावी गुरुजी कपाळावरील केशकलापाशीं खेळत कसला तरी गंभीर विचार करीत असलेले मला दिसले.

तेवढ्याचा फायदा घेऊन मी माझ्या गुरुजींच्या आश्रमाचें अवलोकन करूं लागलों. एक कॉट—स्टो—दोनचार कपबशा—सिगारेटच्या कॅलेंडरवरचा कमलादेवींचा फोटो, बरीचशीं पुस्तकें, एका बाजूच्या कोनाड्यांत सेफ्टी रेझर व त्याचे सहाध्यायी—मॅग्निशिया, फ्रुटसॉल्टची बाटली आणि साधारण दरवाजाच्या आडोशाला असें एनिमा पॉट !

तो सर्व आटपशीर सरंजाम पाहून मला समाधान वाटलें. नाहीं तर माझ्या खोलीचा फापटपसारा !

आणखी एक सांगायचें राहिलें. मीं जेव्हां गुरुजींच्याकडे प्रवेश केला, तेव्हां माझे गुरुजी आपल्या सहाध्यायांबरोबर चर्चा करीत होते. त्यांची ती चर्चा निसटती ऐकल्यामुळेंसुद्धां माझा कितीतरी फायदा झाला होता ! हल्लीं कोणतीहि गोष्ट चर्चा केल्याशिवाय,

त्याच्यावर कुणीं कुणीं काय काय लिहिलें आहे, त्याच्यावर कोण कोण काय काय बोललें आहे वगैरे उलथापालथ केल्याशिवाय मान्य करणें माणुसकीचें लक्षण समजलें जात नाहीं! आमच्या गुरुजींचा "दाढी सेफ्टी रेझरनें करावी का सरळ वस्तऱ्यानें करावी" याच्यावर वाद चालला होता. त्या चर्चेंतसुद्धां कित्येक मोठमोठीं नांवें ऐकायला येत होतीं. वादविवादेच्छू भांडाभांडीपर्यंत आले होते. तेव्हां वाद किती गंभीरपणानें चालला होता हें लिहिणें नलगे!

सांगायचा मतलब एवढाच कीं, कोणतीहि गोष्ट चर्चेशिवाय करणें सुशिक्षितपणाचें लक्षण नव्हे!

माझे गुरुजी विचारतंद्रींतून मोकळे झाल्यासारखे दिसले. आतां काय 'विचार-संग्रह' ऐकायला मिळतो तें मी 'माझ्या जिवाचा कान' करून ऐकायला लागलों.

माझे गुरुजी म्हणाले, "हाय! हाय! अभागी आर्यदेशा! निष्कारण रूढींनीं, कुजक्या, नासक्या धर्मांनीं काय तुझी स्थिति करून टाकली ही! आतां आम्हांला या सर्वांची जाळपोळ करण्या-करितां—"

मीं मध्येंच म्हटलें, "साहेब, कांहीं गोष्टी वाईट असल्या, तरी मला वाटतं, हा देश हिंदुस्थानच होता हें ओळखण्याकरितां खूण म्हणून तशाच ठेवून द्याव्यात. नाहीं तर आपण सर्व एकदम सुधारलों म्हणजे हा इंग्लंड आहे का हिंदुस्थान आहे हें कळायलाहि मार्ग राहायचा नाहीं! आणि 'पुराण-वस्तुरक्षणाचा' कांहीं कायदा आहे ना वाटतं?—"

माझें असें बोलणें चाललें आहे तोंच बहिष्कार मंडळाचे सेक्रे-टरी आंत आले. आमच्या गुरुजींनीं ताबडतोब फाउन्टन पेन काढलें

व 'मी कोणताहि विदेशी माल वापरणार नाहीं' या पत्रकावर सही करून दिली.

मग मींहि हळूच म्हटलें, "साहेब, देशी-विदेशीबद्दल आपलं काय मत आहे ?"

श्रीकांत चंद्रचूड, अर्थात् माझे साहेब, मला म्हणाले कीं, "हें काय विचारतां, तुम्ही अगदींच कच्चे दिसतां ! देशी हाच स्वातंत्र्याचा तरणोपाय आहे. देशी ही परकीयांची अडवणूक आहे ! देशी म्हणजे—"

मीं मध्येंच म्हटलें, "पण साहेब, आपल्या देशाच्या चतुःसीमेंत फ्रुटसॉल्ट, मॅग्निशिया—"

तोंच संचार होऊन साहेब म्हणाले, "वेल दोस्त, आज आपणच माझ्या डोळ्यांत अंजन घातलंत ! विलायती औषधं—फ्रुटसॉल्ट, मॅग्निशिया हीं पहिल्या प्रथम हद्दपार केलीं पाहिजेत ! दोस्त, पोट साफ करण्यापासून जिथं परदेशी, तिथं इतर जिनसांचा काय पाड? आणि बहुतेक कर्मवीर देशभक्तांना—कांहीं का ? पुष्कळसे अपवादहि असतील ! पण मॅग्निशिया, फ्रुटसॉल्टची हकालपट्टी ही आमची पहिली मुव्हमेंट ! मी आतां सर्क्युलर काढतों ! पहिल्यांदा स्वतःचा देह आणि नंतर देश ! काड्यामोड्यांच्या आउतांनीं वाटेल तसल्या बेछूट विचारांची बडबड केली तरी त्याचा काय उपयोग ? बस्, युवकमंडळाचा पहिला प्रापोगँडा म्हणजे मॅग्निशियाची हकालपट्टी ! मॅग्निशिया कांहींना आज लागत असेल—कांहींना उद्यां लागणार असेल—कांहीं एनिमाभक्त असतील, तेव्हां—"

मी युवकमंडळांत सामील झालों.

दुसऱ्या दिवशींच युवकमंडळाची सभा भरली.

श्रीकांत चंद्रचूडांनीं 'फ्रुटसॉल्ट-मॅग्निशिया हकालपट्टी'चा ठराव मांडला.

अर्थात् वादविवाद होऊन सब्जेक्ट कमिटींतून ठराव बाहेर पडला !

पण उघड सभेंत ठरावाच्या चिंधड्या होणारसा रंग दिसूं लागला.

एकजण म्हणाले, " अहो शिष्ट, ही गोष्ट पुढील पिढीकरितां ठेवूं ! ज्यांना आज तशी संवय असेल त्यांची काय तजवीज ? कोणत्या × × × नं आमचा हा वुइक पॉइंट बाहेर काढला ? "

मग माझेंहि भान हरपलें व मी ओरडलों, " मद्बंधूंनो, डरना मत्, हिंमत मर्दा तो मदत खुदा ! तुळशीच्या मर्दानी हिंमतीला हात देण्यासाठीं हा पाहा रायगडचा परमेश्वर—" मीं जीभ चावली ! आणि पुन्हा प्रुफ करेक्ट करून म्हणालों, " साहेब, घाबरूं नका ! मॅग्निशिया-फ्रुटसॉल्टाशिवाय अगदींच ज्यांचं अडेल—वास्तविक अडण्याचं कांहीं कारण नाहीं—पण अडलंच तर त्यांच्याकरितां त्रिफळा आहे— गोड एरंडेल आहे— साधें एरंडेल आहे ! !—"

मग मात्र ठराव एकमतानें पास झाला ! पण शेवटीं कुणाच्या नांवानें ओरडावें हें न समजल्यामुळें—तरी पण उत्साही तरुण थोडाच दबतो !—सर्वजण ओरडले—" जय त्रिफळा ! जय एरंडेल ! ! डाऊन वुइथ मॅग्निशिया ! "

---

# आरोग्याचा शत्रु !

आज मी जी आपल्याला माझ्या आयुष्यांतील गोष्ट सांगणार आहे ती माझें लग्न झाल्यानंतर तीन वर्षें सहा महिने, कांहीं दिवस, कांहीं तास झाल्यानंतर घडलेली आहे. त्यामुळें लाडिवाळ नजरा-नजर—पहिलें-वहिलें लाडिक-लाडिक हंसणें, लाजणें वगैरेची हृदयंगम वर्णनें मला या गोष्टींत देतां येणार नाहींत !

सुरुवातीलाच मी याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करतों !

बाकी पहिल्या-पहिल्यांदा मीं खूप मजा केली.

लग्न झाल्यानंतर सकाळीं किंवा संध्याकाळींच फिरायला गेलें पाहिजे हा नियम मी पूर्णपणें मोडून टाकला व बायकोला घेऊन तिन्ही त्रिकाळ गांवांत भटकायला लागलों !

बोलून चालून बायको म्हणजे आपली अर्धांगी— तिच्याशिवाय फिरायला जाणें म्हणजे मला खरोखरच अर्धांगवायु झाल्यासारखें वाटे!

त्यामुळें मी फिरायलाच काय, पण सकाळीं मंडईत, दुपारीं मित्रांकडे, मधेंच कार्डें-पाकिटें टाकण्याकरितां पोस्ट ऑफिसांत, माझ्या वाहणेचा बंद तुटला तरी तो सहज कोपऱ्यावरून दुरुस्त करून आणण्याकरितांसुद्धां मी बायकोला बरोबर घेऊन जात असे !

बायको शेजारीं असतांना मला जी एक विशिष्ट तऱ्हेनें उभे राहण्याची ऐट साधली होती तिच्याबद्दल माझें मलाच विलक्षण कौतुक वाटे !

आणि अशा वेळीं मी जरी अर्धा आण्याचा व्यवहार केलेला असला आणि माझ्या खिशांत भरपूर मोड असली तरीसुद्धां दुकानदाराच्या अंगावर मी रुपया फेंकीत असे.

त्याच वेळीं माझी बायको एका हातानें अंबाडयावरील वेणी सावरीत नजरेचे किरण तिरपे टाकून माझ्याकडे असे 'स्टायलिश' पाहात उभी राही कीं, मला असें वाटे माझें सबंध आयुष्य कर्तबगारीचें गेलें अन् माझ्या पश्चात् माझा पुतळा करावयाचा झाला तर तो वरील प्रसंगाचाच करावा !

आणि नंतर असें वाटे कीं, आतां जें मला एक मिनिटभर सुद्धां बायकोशिवाय करमत नाहीं, तें लग्नपूर्व इतकीं वर्षें मीं बायकोशिवाय काढलीं तरी कशीं ?

येतात आपले असे विचार मधून मधून !

आमच्या लग्नाचा फारसा गाजावाजा झालेला नव्हता. कारण लग्न जुनाट पद्धतीनें झालेलें ! त्यामुळें तें रजिस्टर कचेरींत नोंदलेंहि गेलें नव्हतें ! दोन-अडीच वर्षें असा सांजसकाळ आम्हीं गांवांत फेरफटका केल्यामुळें व मीहि सबंध गांव पालथा घालीत असल्यामुळें साहजिकच सगळ्या गांवांत आमचें लग्न रजिस्टर झालें ! आतां आम्ही दोघे कोण आहोंत हें आमच्या गांवांत कोणीहि सांगूं शकेल !

पहिल्यांदा जेव्हां आम्हीं फिरायला जायला सुरुवात केली तेव्हां आम्हीं एकमेकांकडे अजिबात पाहात नव्हतों ! ती आपल्या ओळखीचें कोण कोण भेटतें आहे याची अभिमानपूर्वक नोंद करीत चाले. व दुसऱ्या बाजूनें पाहात माझी ओळखदेख किती दांडगी आहे हें नमस्कारांनीं व प्रत्येक नमस्काराला बळजबरीनें खोकत मी बायकोला पटवून देत होतों.

पुढें पुढें आम्हीं एकमेकांशीं रस्त्यांतून बोलत जाऊं लागलों; पण आतां माझ्या ओळखीचे लोकच मुद्दाम खाकरून खोकरून मला नमस्कार करूं लागले.

पुढें पुढें कालमानाप्रमाणें आम्हांला फिरण्यांतलें स्वारस्य कमी

झाल्याचें आढळून आलें; पण हिंडणें आम्हीं अद्याप सोडलें नव्हतें. त्यामुळें रस्त्यांतून आम्ही आतां अशा अजागळ पद्धतीनें हिंडायला लागलों, कीं मी तिच्याभोंवतीं घुटमळतों आहे, का ती माझ्या-भोंवतीं घुटमळते आहे हें आमचें आम्हांलाच समजत नसे !

सरते शेवटीं एक दिवस आमची ही गांवांतली गस्त संपायला एक विलक्षण पण आश्चर्यकारक क्षुल्लक प्रसंग घडला !

तो प्रकार असा—

आमच्या घरांतील दिव्याची कांच फुटलेली होती. ती आणा-यला आम्ही दोघेंहि बाहेर पडलों. गांवांतील आमचें फिरणें संपवून आम्ही एका कांचसामानाच्या दुकानाशीं थांबलों.

मीं दुकानदारापाशीं कांचेची मागणी केली.

दुकानदारानें विचारलें,'कांच ओगल्यांची देऊं का पैसाफंडाची ?'

मीं उत्तर दिलें, 'पैसाफंडाची !'

बायकोनें म्हटलें, 'पैसाफंडाची नको ओगल्यांची घ्यावी !'

मीं हट्ट धरला कांच पैसाफंडाचीच घ्यायची !

दुकानदारानें मध्येंच तडजोड सुचविली, कीं पैसाफंडाची व ओगल्यांची अशी प्रत्येकीं एक एक कांच मीं घ्यावी.

त्या म्हणण्याला कबूल होण्याच्या मी बेतांत होतों !

पण मध्येंच बायको हट्टानें व फणकाऱ्यानें म्हणाली, "आपल्याला कांहीं कळत नाहीं. कांच एकच घ्यायची आणि तीहि ओगल्यांचीच! अहो दुकानदार, कांच ओगल्यांचीच द्या !"

मीं म्हटलें, "कांच ओगल्यांची घेतलीस तर पैसे मी देणार नाहीं !" बेटा दुकानदारहि स्त्रियांचाच कैवारी निघाला. तो म्हणाला, "बाईसाहेब, जा तुम्ही हीच कांच घेऊन. पैसे सावकाश केव्हांहि आणून दिलेत तरी चालतील !"

तोंच माझी बायको रस्त्यांतच रडूं लागली— व स्फुन्दत

स्फुन्दत म्हणाली, 'बायकांना आर्थिक स्वातंत्र्य नसल्याचे हे परिणाम. मला नाहीं हें सहन होणार ! विचारा वाटेल त्यांना—'

आमच्याभोंवतीं आतां खूप माणसें जमलीं होतीं !




त्यांच्याकडे बोट दाखवून ती म्हणाली, 'विचारा वाटेल त्यांना कीं, ओगल्यांची कांच चांगली असते का पैसाफंडाची चांगली असते ती ! इश्श, व्यवहाराची इकडे जरा सुद्धां अक्कल नाहीं ! आणि आज तरी निदान मी तुमचं साफ ऐकायची नाहीं ! आज माझ्या इच्छेविरुद्ध मी तुम्हांला पैसाफंडाची कांच घेऊं दिली तर उद्यां तुम्ही मला गजानन मिलचीं लुगडीं आवडतात तर टिके-करांचींच लुगडीं घेऊन द्याल ! पण मी हे साफ चालू देणार नाहीं ! अस्से हे मेले पुरुष आपमतलबी आहेत ! तरी बरं स्त्रियांचे कैवारी ते मामा वरेरकर 'जागत्या ज्योतीं'तून तुम्हा पुरुषांना थेटरांत

चपलांनीं मारताहेत आणि त्या विशिष्ट चपला कुठें मिळतात याची टीपहि त्यांनीं त्या पुस्तकांत छापली आहे ! '

येवढें बोलून ती एकदम लाडांत आली आणि प्रेमळपणानें मला म्हणाली, " मला त्या चपला घेऊन द्याव्यात गडे ! "

मीं म्हटलें, " लाडके, हा प्रश्नच नको मुळीं ! ओगले आणि पैसाफंड हा वाद हवा कशाला ? माझी खात्री आहे पैसाफंडाचीच कांच जास्त टिकाऊ आहे; पण केवळ मतभेदाकरितां आपण दिवेच वापरायचे सोडून देऊं आणि जिथं इलेक्ट्रिक लाइट आहे अशाच घरीं राहायला जाऊं ! प्राणप्रिये–चलऽ गडे आतां घरीं!–रस्त्यांत हा समतेचा तमाशा हवा कशाला ? "

तरी माझी बायको ! मी असें शूरपणानें पण दीनवाण्या आवाजांत म्हटल्याबरोबर ती मुकाट्यानें चालूं लागली !

त्या दिवसापासून बायकोसकट मीं रस्त्यांत पुन्हा कुणालाच दिसलों नाहीं !

पण आमची ही फेरी गांवांत फारच पॉप्युलर झाली होती.

पुष्कळ लोक आमची जोडी रस्त्यांत हल्लीं कां दिसत नाहीं याबद्दल बारीक चवकशी करीत. ती आमच्या कानांवर केव्हांच आली होती !

इतक्या धामधुमींत सुरुवातीला सांगितल्याप्रमाणें माझें लग्न होऊन तीन वर्षें, सहा महिने कांहीं दिवस व तास लोटले होते.

× × ×

आतां आमच्या घरची परिस्थिति पालटलेली होती.

माझा वडीलभाऊ परगांवीं असे. आमच्या मातोश्री त्याच्याजवळच असत. तिथें त्यांचें अलीकडे पटत नाहींसें झालें होतें म्हणून मीं आमच्या मातोश्रीला माझ्याकडे राहायला बोलाविलें. आमच्या मातोश्री माझ्याकडे येऊन राहिल्या होत्या.

आई आल्यानंतर मात्र आम्ही फार साळसूदपणानें वागायला लागलों. आईला वाटे आपली सून साळसूद आहे आणि चिरंजीवहि पण—

लग्नानंतर पहिल्या पहिल्यांदा आम्हीं पाहिलेलीं सिनेमा-नाटकें आमच्या आईला कुठें माहीत होतीं ? आणि आतां तशीं सिनेमा-नाटकें करावयाची चव आमच्यांत राहिली नव्हती. आमचे 'लाईफ' आतां अगदीं 'रूढि' झालें होतें ! म्हणूनच आई आमच्यावर साळसूदपणाचा आरोप करूं शकत होती !

आमच्या आईचा थाट अगदीं जुन्या वळणाचा. तिची ती तास तास चालणारी देवपूजा, फावल्या वेळांत कापसाच्या वाती वळीत बसणें वगैरे देवधर्म सपाटून चालायचें !

आणि रस्त्यांत माझ्या बायकोशीं घडलेल्या समरप्रसंगा-पासून मी तिच्याशीं धड बोलतच नव्हतों.

तिनेंहि त्या दिवसापासून मनांत अढी धरली होती; आणि आई येण्याच्या पूर्वी हे सर्व थारेपालट होऊन गेल्यामुळें आमच्या अबोल्याला साळसूदपणाचें स्वरूप आलें होतें !

* * *

असे कांहींसे कंटाळवाणे दिवस जातां जातांच मला व माझ्या बायकोला मलेरियाचा ताप यायला लागला. आज माझी तापाची पाळी, तर उद्यां तिची; असा खोखोचा डाव चालला होता ! अर्थात कामधाम सर्व आईवरच पडे ! त्यामुळें आमच्या अर्धांगी सासू-बाईवर फारच खुषींत होत्या !

मी पूर्वीपासून कादंबरी गोष्टी वगैरे फार वाचीत असे; पण आतां माझी ती आवड पार नाहींशी झाली होती व प्रवासवर्णनें, निबंध वगैरे गंभीर स्वरूपाचें वाङ्मय मी मध्यंतरीं वाचून काढूं लागलों.

आमच्या मलेरियाला आतां सहा महिने होत आले होते.

निबंध प्रवासवर्णनें वगैरे वाचायचा आतां मला कंटाळा आला होता, म्हणून मीं पुन्हा ललित-वाङ्मय हाताशीं धरलें !

माझ्या आईलाहि थोडेंबहुत वाचायला येत होतें. तीहि फावल्या वेळांत माझ्या टेबलावरचे मासिकाचे, साप्ताहिकाचे अंक घेऊन वाचूं लागली होती.

पण काय चमत्कार सांगावा ?—

अगोदरच म्हातारीं माणसें गंभीर ! त्यांत आणखी आईनें वाचायला सुरुवात केल्यापासून रोज रोज ती जास्त जास्तच गंभीर बनत चालली !

आम्ही मायलेंकरें जेवण झाल्यानंतर गप्पा मारीत बसत असूं तेंहि अलीकडे बंद पडलें.

हें असें कां होत आहे याचा मला अंदाज लागेना !

आईच्या वाढत्या गंभीरपणामुळें मीहि थोडा काळजींतच पडलों.

अखेर एक दिवस आईनें फार्सच केला.

वेळ दुपारची होती.

आईनें आपली बळकटी खांकोटीला मारली. एका हातांत पाण्याचा तांब्या घेतला आणि अश्रुपूर्ण लोचनांनीं माझ्या खोलींत येत मला म्हणाली,

" बाळ, जातें आतां मी ! "

" कुठें जातेस आई ? "

" तुझ्या थोरल्या भावाकडे माझें पटलें नाहीं म्हणून तुझ्याकडे आलें तर तुलाहि त्रास होतो आहे––"

मीं गहिंवरून म्हटलें, "आई कुणी म्हटलं असं ? तुझ्यापासून आम्हांला त्रास ? काय भलतेंच बोलतें आहेस आई !"



" ठेव ती वळकटी खालीं—" मीं तिच्या खांकेंतली वळकटी बळेंच खालीं ठेवून दिली.

तों आई जास्त जास्तच स्फुंदूं लागली. आतां काय करावें तें मला सुचेना. मी पुन्हा म्हणालों, " आई, असं काय करतेस वेड्या-सारखं ? कुणी सांगितलं तुला तुझ्यापासून आम्हांला त्रास होतो आहे म्हणून ? "

" बाळ, तूं प्रत्यक्ष तसं कसं म्हणशील ? पण माझ्यापासून तुला त्रास होतो आहे हें नक्की ! माझं गुणाच बाळं तें ! इतक्या दिवस विनाकारण माझ्याकरितां त्रास सोसला माझ्या बाळानं ! आहेच तुझं तसं प्रेम, माझ्यावर; पण बाळा, नुसतं प्रेम काय करायचं ? माझ्यामुळं जर तूं असा सारखा आजारी पडूं लागलास—"

" काय ? तुझ्यामुळं मी आजारी पडलों !" मी आश्चर्यातिशयानें ओरडलों.

" बाळ, कळूनसवरून असं वेड कां पांघरतोस ! बाळ, तुझ्या आणि सूनबाईच्या आजारीपणाला मीच कारणीभूत आहे बरं ! तुमच्या आरोग्याचा मीच शत्रु आहे ! "

" म्हणजे म्हणतेस तरी काय तूं आई ? "

" खरं आहे तेंच म्हणतें आहे ! मी आज पंधरा दिवस तुझ्या टेबलावरचे विचारप्रधान ग्रंथ वाचले, त्यांतच हें कळलं मला ! मी आपली जुनीपुराणी बाई; आम्हांला काय कळणार तुमचीं अलीकडचीं शास्त्रं ? पण बाळ, मला तूं असं स्पष्ट कां सांगितलं नाहींस ? "

" काय सांगायचं आई मीं तुला स्पष्ट ? "

आई स्फुंदत म्हणाली, " मला रे काय माहीत नवरा-बायकोनीं असं वागायचं असतं तें ! मीं वाचलेल्या ग्रंथांत–बायकोनें नवऱ्याचे डोळे झांकायचे असतात ! केस सांवरायचे असतात ! लपंडाव खेळायचे असतात ! रुसण्या-फुगण्यांत पटकन घळघळ रडायचं असतं, लगेच खुदूकन हंसायचं असतं ! नवरा-बायकोनीं इथून पुढं 'सगळं जग कोणत्या तत्त्वावर चालवायचं' हें ठरवायचं असतं ! पुरुषांच्या कर्तव्यावर बायकोनं लेक्चरं झोडायचीं असतात आणि स्त्रियांच्या दुःस्थितीवर पुरुषांनीं रडगाणीं गायचीं असतात ! आम्ही बाई पहिल्यापासून अडाणी, आम्हांला पहिल्यापासून कांहींच कळत नव्हतं आणि आतांहि अजून फारसं कळत नाहीं ! आणि तूं मर्यादशील पडल्यामुळं माझ्यादेखत असं मोकळे–ढाकळेपणानं तुला सुनबाईशीं वागतां येत नाहीं, म्हणूनच तूं हा असा आजारी पडलास !– बाळ, अलीकडच्या हवापाण्यांत जर असं वागल्यावांचून प्रकृति ठीक राहात नसेल तर, तुझ्या मुळावर मी कशाला राहूं या

घरांत ? मी पडेन कुठंतरी देवळांत ? मला आपले पांच-दहा रुपये देत जा खर्चायला दर महिना, देशील ना ? बाळ, वाईट वाटून घेऊं नकोस ! माझ्या काय आतां स्मशानीं गोवऱ्या गेलेल्या ! पण तूं सुखांत राहा ! आण ती वळकटी इकडे, जातें आतां मी ! भेटत जा हं मला मधून मधून—"

मी सर्व शांतपणानें ऐकून घेतलें व नंतर बळूटपणानें ओरडलों, "अग आई, तूं वाचलंस तें सर्व खरं नव्हे ! काव्य म्हणतात त्याला ! खोटं खोटं असतं तें बहुतेक सगळं !"

पण आईचा माझ्या बोलण्यावर विश्वासच बसेना. ती खांकेंतील वळकटी सावरीत शांतपणानें म्हणाली, "बाळ मीं इथं राहावं म्हणून कशाला विनाकारण खोटं बोलतोस ? छापलेलं कधीं खोटं असतं का?"

मी आईची समजूत करण्याकरितां म्हणालों, "अग आई, तुला माहीत नाहीं, हल्लीं खोटंच फार छापतात !"

मी जीव तोडून सांगत होतों तरी आईची समजूत पटेना व ती घरांतून निघून जाण्याचा आपला हट्ट सोडीना !

अखेर मीं तें सर्व वाङ्मय फाडून आईच्यादेखत त्याला काडी लावली आणि निदान आई हयात असेपर्यंत तरी असलें वाङ्मय घरांत आणायचें नाहीं असा मनांत ठाम निश्चय ठरविला !



# जगणें हासुद्धां गुन्हा आहे!

त्यानें खिडकी उघडली तों बाहेर चक्क चांदणें पडलें होतें !

आरशांत पाहतांच पाहणाराचें प्रतिबिंब आणि खिडकी उघड-तांच बाहेरचा उजेड किती झटकन् आंत येतो, कीं जणूं एकाद्याला वाटावें, कीं आरशांत आपलें प्रतिबिंब पहिल्यापासूनच होतें आणि उजेड आंतच होता, पण तो खिडकी उघडल्यामुळेंच आपल्याला दिसला !

त्याचप्रमाणें त्यानें खिडकी उघडली आणि बाहेरचें चांदणें अधाशीपणानें आंत घुसलें. तरी तो खिडकीबाहेरच डोकावून पाहात होता. जणूं काय आपल्या घरांत घुसल्यामुळें बाहेरचें चांदणें कांहीं कमी झालें कीं काय, हें तो अजमावीत होता !

तो कवि होता — जन्मजात कवि होता. अर्थात् तो चांदणें पाहून आनंदानें प्रफुल्ल झाला हें सांगणें नकोच !

पण आणखी एक गोष्ट सांगायला पाहिजे म्हणजे त्याच्या आनंदाचा अतिरेक कळून येईल. आणि ती गोष्ट म्हणजे त्याच्या घरांत दिव्यांत घालायला तेल नव्हतें ! दिवसा-उजेडीं जेवणें आटपून कविबाळकें निजविलेलीं होतीं व कवि आणि कविप्रिया अंधारांत जागत होतीं. असा बराच वेळ झाला. आतां चांदणें स्वच्छ पडलें असलेंच पाहिजे या कल्पनेनें त्यानें खिडकी उघडली आणि त्यामुळें दिव्यांत तेल नसतांनाच त्याच्या त्या छोट्या बिऱ्हाडांत चंद्रज्योतीचे दिवे लागले !

आतां त्या कविरायानें घरांत वळून पाहिलें— आपलीं बालकें स्वस्थ झोंपलेलीं आहेत. आणि—त्या कविरायाची सरस्वती—घरांत देवाघरचे दिवे लागले म्हणून आळस झाडून हुशार होत होती !

त्यानें चूळ भरून टाकली आणि तो खिडकीजवळ येऊन बसला, तशी त्याची सरस्वतीहि त्याच्या अंगावर रेलून बसली !

आणि एकमेक एकमेकांकडे पाहून गालांतल्या गालांतच हंसलीं !

त्या हंसण्याचा आवाज झाला नाहीं हें खरें पण—एकाद्या सहृदयानें तो प्रसंग— कविरायाचें चरित्र माहीत असतांना जर पाहिला असता तर तें हंसणें पाहून त्याच्या हृदयांत एवढा कोलाहल माजला असता, कीं त्यामुळें त्याच्या कानठळ्याच बसल्या असत्या !

* * * *

तो कवि होता.

त्याची भार्या जरी कवयित्री नव्हती तरी सहृदय होती. तिला आपल्या पतीच्या कवितेचें मर्म कळत होतें. आणि कविबालकें, कुणाला खरें वाटायचें नाहीं— कारण सगळें जग हल्लीं 'ओव्हरहॉल' करायला झालेलें आहे असा पुष्कळांचा तर्क आहे, तेव्हां सगळीकडेच कुरकुर—पण तीं कविबालकें आईच्या नजरेच्या धाकांत इतकीं होतीं कीं,घरांत इतकें गडगंज दारिद्र्य—पण शक्य असलेल्या ओल्या-कोरड्या भाकरीचा चारा भरवून अंगावर नित्यनेमानें धुतलेले पांढरे शुभ्र सदरे घालून, तीं कविबालकें त्या माउलीनें बाहेर खेळायला सोडलीं कीं—ओऽ हो ! जसे हिरवळीवर बागडणारे ससे !

त्याचें नशिब म्हणा—योग म्हणा— पण त्याला कीर्ति आणि पैसा यांपैकीं कशाचीच जोड मिळाली नव्हती ! अजून नवल वाटतें, त्या जिवंत झऱ्याची चाहूल कुणालाच कशी लागूं नये ?

मनुष्य चिडला म्हणजे म्हणतोच, चाहूल कशी लागली नसेल ? ही जाणून बुजून केलेली डोळेझांक असेल !

कारण त्याचें काव्य म्हणजे इतक्या मोलाचें होतें की, कविवर्य टिळकांप्रमाणें त्यालाहि आपल्या कवितेसंबंधानें हक्कानें म्हणतां आलें असतें कीं—

'हीं निःश्वसितें ! कोण सोडितें मम हृदयीं तें—'

अशा तऱ्हेनें पायांखालीं रखरखलेलें परिस्थितीचें ऊन्ह आणि हृदयांत नाना कविकल्पनांचे शीतल झरे, अशा भौगोलिक परिस्थितींत तें कविशरीर वावरत होतें !

आणि तो म्हणे—अशा परिस्थितींत इतक्या सुखासमाधानानें राहणारी पत्नी—असलीं हजार दारिद्र्यें मी आनंदानें सहन करीन !

*      *      *      *

पण —

हाडामांसावर कातडें असतें म्हणून काल हंसत-खिदळत पाहिलेला मनुष्य आज कां मेला ह्याचें आपण आश्चर्य करतों. कारण कातडीच्या आंत मरणाची कशी जय्यत तयारी झालेली असते हें कुणाला कसें कळणार ?

त्या कवीच्या 'आशेला'हि आतां वृद्धावस्था आलेली होती ! समाधानी वृत्तीहि संपत आली होती !

आज चाळीस वर्षे ती समाधानाची दिवटी पेटलेली होती—

आतां साहजिकपणेंच ती मंदावलेली होती.

मध्यें विसांवा नाहीं—सहानुभूतीचा ओलावा नाहीं.

आतां त्या कविहृदयाला परिस्थितीची विश्रांति पाहिजे होती—पण सर्वत्र निराशा पसरलेली होती ! आशेचा एकहि किरण कुठें दिसत नव्हता !

*      *      *      *

आतां चांदणें इतकें फुटलें होतें, कीं त्या उजेडांत वाचणेंहि शक्य होतें. त्या कविरायानें खिशांतले कांहीं कागदपत्र काढले आणि तो चाळूं लागला—

सरस्वती हंसत म्हणाली, "कसे बाई दिवस निघायचे हे—" चिळ्या चाळीत चाळीत कविराज पुटपुटले, "अग, हेहि दिवस निघतील ! आपल्या अडचणी भागल्या नाहींत म्हणून कांहीं दिवस जायचे थांबत नाहींत—"

त्यानें आपल्या बायकोकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें. त्याची अपेक्षा होती. आपल्या या बोलण्यावर बायकोनें हंसावें म्हणून; पण तिच्या डोळ्यांत आंसवेंच भरून आलीं. आणि ती म्हणाली, "माझं कांहीं नाहीं हो– तुम्ही आणि मीच असतो, कीं कसेहि ओले-कोरडे दिवस काढले असते!–पण– आपल्या चिल्यापिल्यांची फारच आबाळ होते आहे हो अलीकडे ! !"

बोलण्याचा प्रवाह अडविण्याकरितां कविराजानें एक वाक्य मध्येंच उच्चारलें. "तरी आपलीं पोरं कहारी नाहींत. नाहीं तर कळलं असतं सुख !"

"म्हणून तर जास्त वाईट वाटतं–माझ्या माहेरचं गोत कमी का सुखी आहे–आणि आपलेहि नातेवाईक कमी का श्रीमंत आहेत? कुठंहि ठेविलीं तरी माझ्या बाळांना सुख लागेल–"

बेभानपणानें कविराज बोलून गेले, "अलीकडे असेच विचार माझ्या मनांत येतात! मी आहे म्हणून आपणांस कुठें त्यांची सोय करतां येत नाहीं आणि मी तर हा असा निष्कांचन !! आपलीं पोरं पोरकीं झालीं तर सुखांत राहतील ! ! मी नुसता त्यांच्या सुखांत अडथळा म्हणून जगतों आहे! माझ्यासारख्यानें जगावें तरी कां?"

अंधेऱ्या जागींच सापाची सळसळ ऐकूं यावी त्याप्रमाणें सरस्वती भीतीनें घाबरून उठली. "इश्श, असं का म्हणालें मी —"

" अग तसं नव्हे —आपल्या अभिमानाकारितां कुणाचीच मदत घेतां येत नाहीं आपल्याला ? होय कीं नाहीं– अग मी तरी तेंच म्हणतों— तुला काय वाटलं मी आत्महत्या वगैरे —? ? ? "

ती सारी रात्र सरस्वतीनं तळमळत काढली. तिला स्वस्थ झोंप आली नाहीं !

बिचारा कवीहि तळमळत होता. तो मनांतल्या मनांत पुटपुटे. " काय नशिब आहे पाहा — मी आहे म्हणून पोरांना आसरा नाहीं ! मला त्यांना सुखी ठेवतां येत नाहीं–पण त्यांच्या सुखाचा दावेदारी होऊन मी बसलों आहे ! ! माझ्यासारख्यानें जगणें हा-सुद्धां गुन्हा आहे ! "



# वहिनींच्या बांगड्या

आतां ह्या वयांत लहानपणच्या आठवणी आठवून सांगायच्या, म्हणजे कोण प्रयासाचें काम ! पण तें काम प्रयासाचें असलें तरी आनंदाचें आहे ! फणस फोडून आंतील 'गरे' काढणें मेहनतीचें असतें, पण तें काम आपण जसें हौसेनें करतों, त्याप्रमाणें विस्मृतीचा फणस फोडून आंतील आठवणीचे गरे काढणें व ते चोखीत बसणें हेंहि काम आनंदाचें व हौसेचें आहे !

म्हणून मी माझ्या आयुष्यांतील अगदीं सुरुवातीचा प्रसंग कोणता आठवतो तो आठवूं लागलों !

लहानपणांतील आठवणींचा आरंभ म्हणजे आईपासून होतो; पण मला आठवत नाहीं इतक्या लहानपणीं माझी आई मला सोडून गेली होती. तेव्हां तिच्याविषयीं मला काय आठवणार ? नाहीं म्हणावयाला आठवणींत मला अळेंबळें 'आई' ओढून आणतां येईल. आणि ती कशी ?— तर लहानपणीं मला कोणी माझ्या आईविषयीं विचारूं लागला, तर 'मला आईच नव्हती !' म्हणून मी सांगत असे; आणि माझ्या आईविषयीं आठवण मला एवढीच देतां येईल !

एखादें फुलझाड खच्ची केलें, कीं तें जोरानें वाढतें व लवकर फूल धरतें असें म्हणतात; त्याप्रमाणें आईच्या ताटातुटीनें मी खच्ची झालों होतों, आणि त्यामुळेंच कीं काय, मला फार लहानपणापासून कळायला लागलें होतें !

नंतर मला आठवतें, आम्ही दोघे भाऊच आमच्या घरांत राहात होतों. आमचा थोरला भाऊ—मी त्याला दादा म्हणत असे—स्वयंपाक करी व ताटें वाढी. नंतर मीं जेवण झाल्यानंतर उष्टीं-खरकटीं करायचीं. राहिलेलें आमच्या दादानें आवरायचें, हा आमचा नित्यक्रम. त्या वेळीं दादाचें वय सव्वीस वर्षांचें होतें. व माझें सुमारें नऊ वर्षांचें होतें!

मी आजूबाजूच्या घरांत पाही—माझ्या वयाचीं मुलें कुणी 'ताई' म्हणताहेत, कुणी 'माई' म्हणताहेत, कुणी 'आई' म्हणून हाक मारताहेत,—पण आम्हांला बहीण नसल्यामुळें आम्हांला तशी हाक मारण्याची कांहींच सोय नव्हती! मला कसेंसेंच वाटे! मी दादाला म्हणे, "दादा, मला बहीण कां नाहीं—आई कां नाहीं?" तो म्हणे, "बाळ, आपल्या नशिबीं नाहीं!" मला वाटे 'नशिबा'ची शिक्षा देवानें माणसाला मोठेपणीं भोगायला लावावी! इतक्या लहान वयांत आमच्या मागें नशिब कां? ताई—माई—आई या नात्यांची सावली आमच्यावर कां नसावी?

चैत्र महिन्यांत आमच्या सगळ्या मित्रांकडे 'हळदीकुंकवाची' खिरापत खायला जायचा योग मला येत असे! पण आमच्या घरीं? तेव्हां एक वर्ष आमच्या दादानें नुसती खिरापत तयार केली, आणि मीं आपल्या सर्व मित्रांना खिरापतीला बोलाविलें—पण त्यांत कांहींच गम्मत आली नाहीं—सगळाच रखरखीतपणा!

तसें पाहायला गेलें, तर आमची त्या वेळची स्थिति साधारण गरिबीचीच होती; पण आम्हांला कांहींच कमी नव्हतें! दादाला कलेक्टरऑफिसमध्यें पन्नास रुपये मिळत असत, आणि तेवढ्यांत आमचें छान भागत असे!

गांवांत लग्नसराई सुरू झाली होती. लगेच मला वाटलें आमच्या घरांत कुणाचें लग्न होणार आहे का नाहीं? मी तडक दादाजवळ

गेलों आणि त्याला विचारलें, "दादा, माझं लग्न केव्हां होणार?" दादानें माझी पाठ थोपटीत म्हटलें, "तूं मोठा झाल्यावर!"

मग मीं म्हटलें. "मग तूं मोठा आहेस. तुझं लग्न कां अद्याप झालं नाहीं?" ह्या प्रश्नावर दादानें फक्त माझ्याकडे पाहिलें. त्याची आणि माझी नजर एक झाली–इतक्यांत आमच्या दादाकडे कुणीसें आलें. म्हणून तो उठून त्याच्या बसावयाच्या खोलींत गेला. आणि मी आमच्या शेजारच्याच बिऱ्हाडांत लग्न होतें तिथें–पुष्कळ बायका जमल्या होत्या त्यांजकडे पाहात—आशाळभूतपणानें —उभा राहिलों!

आणि परत येऊन दादाच्या खोलीबाहेर उभा राहिलों, तों खालील संवाद ऐकल्याचें मला अस्पष्ट आठवतें. त्या वेळेला मला त्या संवादाची कांहींच किंमत वाटली नव्हती–पण आज–अजून त्या संवादाची आठवण झाली कीं, डोक्यांत कसली तरी भिरभिरी सुरू होते–डोळे पाण्यानें भरतात–आणि हृदयांत मात्र रखरखलेल्या तप्त भूमीवर पाऊस पडून थंडावा यावा त्याप्रमाणें होतें!

"छे:, मला अजून पांचसहा वर्षं लग्न कर्तव्य नाहीं!"

"कां?"

"नाहीं म्हटलं ना. तेंच खरं—"

"पण कांहीं तरी कारण सांगा ना–मी आपल्याला कांहीं तितका परका नाहीं. आतां तुम्ही या वयांत हातांनीं करून खाणं वगैरे विनाकारण त्रास करून कां घेतां–अनायासं सोय होईल–"

पण यावर आमचा दादा निश्चयी स्वरांत म्हणाला, "त्याचं असं आहे–आमच्या घरांत बायकोमाणूस कोणीच नाहीं–त्यांतून धाकट्या भावाची जबाबदारी माझ्यावर आहे–समजा, मीं लग्न केलं आणि नंतर त्या मुलीचं आणि माझ्या भावाचं नाहीं पटलं तर–माझ्या मनाचा तरी काय नेम सांगावा–मी बायकोच्या आधीन

कशावरून होणार नाहीं ? तेव्हां माझा भाऊ कांहीं तरी मार्गाला लागेपर्यंत कांहीं झालं तरी मी लग्न करणार नाहीं ! ”

“ आपल्या या म्हणण्यांत मला कांहींच तथ्यांश दिसत नाहीं– पुढं येणाऱ्या काल्पनिक संकटांवर—”

“ पण मीं जीं कांहीं गृहचित्रं पाहिलीं आहेत, त्यावरून मीं हा निश्चय बनवला आहे !” वगैरे—वगैरे.

* * * *

त्यानंतर पांच वर्षं गेलीं. त्या पांच वर्षांत सांगण्यासारखें असें कांहींच आठवत नाहीं ! आमच्या दादाचें लग्न अद्याप व्हावयाचें होतें, व मी इंग्रजी तिसऱ्या इयत्तेंत होतों.

तो दिवस शनिवारचा होता. मी शाळेंतून घरीं येऊन, पुस्तकें जाग्यावर ठेवून– दशमी खायला बसण्याच्या विचारांत होतों. इतक्यांत माझ्या कानांवर आलें, कीं आमच्या दादाचें लग्न ठरलें आहे. आमचे एक लांबचे चुलते आले होते व त्यांच्या मध्यस्थीनें लग्न ठरलें होतें. दादाचें लग्न ठरल्याचें ऐकून मला अति आनंद झाला होता. पण आमचे चुलते वगैरे तेथेंच असल्यामुळें मी न बोलतां वागत होतों. नंतर कांहीं कारणाकरितां ते आमचे चुलते बाहेर जाण्याकरितां निघाले; त्यांचें पाऊल उंबऱ्याबाहेर पडण्याचा अवकाश, मीं दादाच्या कमरेला मिठी मारली, आणि दादाला म्हटलें, “ दादा, तूं मोठा वाईट आहेस !” दादा आश्चर्यानें म्हणाले, “ कां रे बाबा ?”

“ तूं आपलं लग्न मला न विचारतां कां ठरवलंस ? माझी वहिनी मला अगोदर पाहायला पाहिजे ! तुझी नायको मी पसंत करणार ! ”

आमचें हें भाषण बाहेर आमच्या चुलत्यानें ऐकलें वाटतें. ते

तसेंच आंत आले, आणि दादाला म्हणाले, "काय रे, काय म्हणतोय् हा ?"

"त्याला त्याची वहिनी पाहायला पाहिजे अगोदर !" दादा विनयानें म्हणाला.

माझ्याकडे पाहात आमचे चुलते मला म्हणाले, "होय रे ! बराच मिस्किल आहेस कीं ! मग जा तर तूं आतां एकटाच आणि ये पाहून !"

मीं दादाला म्हटलें, "तूं चल रे दादा माझ्याबरोबर !"

"छे: ! तो नाहीं येणार बाळ आतां ! आम्ही आतां पुन्हा जाणं वाईट दिसेल—तूंच एकटा जाऊन पाहून ये !"

मी विजार चढवीत म्हणालों, "खरंच दादा, जाऊं मी एकटा !"

"हं, ये जा जाऊन !" मी आनंदानें तरारलों. कोट अंगांत चढवला व टोपी डोक्यावर बसवीत दादाला म्हटलें, "हं, पण दादा, मला नाहीं ती वहिनी पसंत पडली तर—ती नाहीं हं वहिनी करायची आपल्याला !"

"बरं—बरं !" दादा म्हणाला.

मी घराबाहेर पडलों, पण लगेच दादांनीं मला हटकलें, "अरे वेड्या, चाललास कुठं ? कुठं जाऊन मुलगी पाहणार तूं ?"

नंतर मी भानावर आलों ! पत्ता विचारून घेतला व बाहेर पडलों. रस्त्यांत मला वाटलें बरोबर कुणीं तरी न्यावें, म्हणून मी एकदोन मित्रांकडे गेलों; पण ते घरीं भेटले नाहींत, म्हणून आमची स्वारी 'वधूपरीक्षे'करितां एकटीच निघाली !

* * *

मीं घरनंबर पाहिला. तो बरोबर होता. म्हणून आंत चौकशी केली. तों आमच्या वहिनींचे वडीलच मला दाराशीं भेटले. ते म्हणाले, "कुणाकडून आलांत आपण ?"

मी नांव, आडनांव सांगण्याच्या भानगडींत कशाला पडतों आहे ! मीं ताबडतोब मुद्दयाचें वाक्य सांगितलें, " मी आमच्या दादाची बायको पाह्यला आलोंय् ! " आमच्या वहिनींच्या वडिलांना गंमत वाटली. त्यांनीं मला 'अहो-जाहो'च म्हटलें. मला वाटलें कीं, मी आतां केवढा मोठा झालों !

आम्ही माडीवर गेलों. तेथें बसावयाचें जाजम घातलेलेंच होतें. मीं तिथें जाऊन तक्क्याला टेकून बसलों. पांच एक मिनिटें गेलीं. आमच्या होणाऱ्या वहिनी माझ्यासमोर येऊन बसल्या. त्या गालां-तल्या गालांत हंसत होत्या. मला वाटतें, आमच्या वहिनींची आई आणि धाकट्या दोन बहिणी जिन्यांतल्या दारांत येऊन हंसत उभ्या होत्या ! त्या कां हंसत होत्या हें मला कळेना. त्यांचें हंसणें ऐकून मला लाजल्यासारखें झालें !

आमच्या वहिनी ! त्या वेळचें त्यांचें तें चित्र अजून माझ्या डोळ्यांसमोर जसेंच्या तसें आहे ! काय वर्णन करूं ? मूर्तिमंत प्रेमळपणा माझ्यासमोर दिसत होता ! महालक्ष्मीची रेखीव प्रतिमा करतात ना—तशीच सतेज—आणखी काय बरें ?—छेः वर्णन कसलें करणार, कपाळाचें ! त्यांचें त्या वेळचें स्वरूप अक्षरशः अवर्णनीय होतें ! माझी आई कशी होती, तें मला आठवतच नव्हतें—पण कल्पनेंत माझी आई होतीच—मला वाटलें मी माझ्या आईची लहानपणची प्रतिमा पाहतों आहे !

अशा तऱ्हेनें मी गोंधळून गेलों होतों. आमच्या वहिनींचे वडील तिथें उभेच होते. वहिनी गालांतल्या गालांत सारख्या हंसतच होत्या ! बाहेरहि हंसण्याची कुजबूज चालूच होती.

वहिनींच्या वडिलांनीं मला विचारलें, " विचारायचं आहे का कांहीं ? "

मीं 'हो' म्हटलें, आणि काय विचारायचें तें आठवूं लागलों. मुली पाहण्याचे कांहीं प्रसंग मीं पाहिलेले होते! पहिल्यांदा काय विचारतात बरं? "हं, मुली, तुझं नांव काय– शिक्षण—" पण मला अशा प्रश्नांच्या भाराभर चिंध्यांची मुळीं जरूरच भासली नाहीं. माझ्या वहिनी मला पसंत होत्या!

कोणता तरी एक प्रश्न विचारायचें मीं मनांत ठरविलें आणि तो प्रश्न उच्चारण्याचा मी सारखा सात मिनिटें प्रयत्न करीत होतों; पण तोंडांतून एक शब्द निघेना—अखेर मला काय भांबावल्यासारखें झालें कुणास ठाऊक—मीं एकही प्रश्न न विचारतां —वहिनींच्या वडिलांना कांहीं एक न विचारतां फक्त आमच्या होऊं पाहणाऱ्या वहिनींना "वहिनी, जातों बरं का!" असें सांगून जो तिथून बावळटासारखा पळत सुटलों, तो रस्त्यांत येऊन स्थिर झालों! त्या वेळेला मी किती आचरटासारखा वागलों याची आठवण झाली, कीं माझें मलाच आतां किती भयंकर लाजल्यासारखें वाटतें आहे! घरीं आल्यावर दादाला वहिनी पसंत असल्याचें सांगितलें. नंतर लवकरच दादाचें लग्न झालें. वहिनी आमच्या घरीं आल्या! आमच्या घराला शोभा आली! पूर्वीं आम्हीं आपल्या घरांत दिवे लावीत होतों—त्यामुळें उजेडहि पडत असे– पण अलीकडे वहिनी घरांत दिवे लावूं लागल्यापासून त्या दिव्याच्या उजेडांतहि कांहीं सौंदर्यवर्धक जादू भरली आहे, असें मला वाटूं लागलें!

वहिनी पहिल्या पहिल्यांदा नवेपणामुळें फार लवकर लवकर माहेरीं जात. मला त्या वेळेला वाटे, माहेर ही अत्यंत वाईट गोष्ट आहे! वहिनी म्हणत, "भाउजी, हें हो काय– जाऊं द्या ना मला— मी उद्यां तर परत येणार आहे!"

मी म्हणे, "वहिनी, हें हो काय! तीनतीनदां कसलं माहेर?

ही माहेराची कटकट तीनतीनदां नकोच मुळीं– उद्यां तुम्ही परत येतांना आपलं माहेरच इकडे घेऊन या ! ”

“ भाउजी, तुम्हांला कळायला कधीं लागणार ? अगदींच पोरकटासारखं बोलतां आणि वागतां तुम्ही ! ” वहिनी म्हणत.

आणि दादा म्हणत असे कीं, “ छावड्या ( माझें नांव भाऊ, पण आमचे दादासाहेब रंगांत आले कीं, मला ‘छावड्या’ म्हणत ) गाढवा, वहिनीच्या पाठीमागं काय असतोस रे एकसारखा ? हल्लीं माझ्याशीं बोलायलासुद्धां तुला वेळ नसतो ना रे ? आणि अभ्यासा-कडे दुर्लक्षच ! ”

आणि झालें होतें तसेंच. दादापेक्षां माझी आणि वहिनींचीच जास्त गट्टी होत चालली होती ! वहिनी घरांत येईपर्यंत मला दादाचा धाक असा वाटत नव्हता– पण अलीकडे कां कुणास ठाऊक– त्याचा मला धाक वाटूं लागला होता. मी अल्लडच होतों, तरी माझें वय वाढत होतें आणि वयानुरूप अभ्यासहि वाढत होता– अर्थात् दादा कांहीं कांहीं बाबतींत मला बोले–माझ्यावर रागावे–पण त्यांत सुद्धां मला गंमत भरलेली वाटे !

नंतर––

मोकळ्या मैदानांत गप्पागोष्टी करीत चुरमुरे खात बसावें, अशांत वाऱ्याची वावटळ यावी, आणि आपण आवरीत असतांना त्या वाऱ्याच्या सरींत पुष्कळसे चुरमुरे झोतानें उडून जावेत, त्याप्रमाणें मधल्या किती तरी दिवसांच्या आठवणी उडून गेल्या आहेत !

× × ×

मध्यें एकदां वहिनींचें आणि माझें भांडण झालें होतें. त्याचें कारण, मी एकसारखा आठविण्याचा प्रयत्न करतों आहे, पण तें आठवतां आठवत नाहीं. थोडीशी पुसट आठवण झाली आहे तेवढीच देतों !

वहिनींनीं माहेरून कसला तरी फराळाचा डबा आणला होता व तो बहुतेक मींच खाऊन संपवला होता ! त्याच दिवशीं आम्ही दोघेजण कशावरूनसे बरेंच तंडलों. त्यांपैकीं आतां फक्त वहिनींचेंच एक वाक्य मला आठवत आहे ! 'हो— आणखी वाटत नाहीं कांहीं माझ्या माहेरच्या गोष्टींना नांवं ठेवतां ते ! आज सबंध दिवसांत माझ्या माहेरचं फराळाचं खाल्लंत तें !' नंतर तंटा मिटला; पण तें वहिनीं-चें वाक्य मात्र माझ्या बरेच दिवस स्मरणांत राहिलें होतें !

आणि त्या वाक्याचा म्यां दुष्टानें अति वाईट उपयोग केला !

दादाला आणि मला आज वहिनींच्या माहेरीं जेवायला जायचें होतें ! पण मी जेवायला जायची वेळ येईपर्यंत कांहींच बोललों नाहीं. पण आयत्या वेळेला जेव्हां वहिनींचा भाऊ जेवायला बोलवायला आला, त्या वेळीं मीं दादाला सांगितलें कीं, " दादा, तूंच जा एकटा जेवायला; मीं नाहीं येणार— वहिनी मला म्हणतात कीं, माझ्या माहेरचंच खातां कीं नाहीं ! "

हें वाक्य ऐकून दादा भयंकर रागावला. त्यानें बोलावणें परत पाठविलें; आणि मी वहिनींची कशी गंमत केली या विचारांत आनंदांत होतों !

सुमारें बारा-साडेबारा वाजतां वहिनींचे वडील आणि वहिनी आमच्याकडे येतांना मला दिसल्या. वहिनी ! आतां लिहायला-सुद्धां कसेंसेंच वाटतें. भर बारांचें ऊन्ह. पायांत कांहीं नाहीं ! सबंध चेहरा घामानें डबडबलेला. केससुद्धा घामानें चिंब झालेले. कपाळावरील घामाच्या ओघळानें कुंकवाचा रक्तवर्ण रंगाचा सडा गालांवर झाला होता. त्या ज्या धापा टाकीत माझ्याजवळ आल्या आणि जरी त्या मनांतून माझ्यावर खूप रागावल्या होत्या, तरी 'रागावण्या'ला समजुतीचें रूप देऊन त्या म्हणाल्या कीं, " भाउजी, बरेच कीं हो आहांत— कधीं थट्टेनं कांहीं तरी म्हटलं

असेल, तें असं भलत्या वेळीं उकरून काढतां होय– चला जेवा-यला ! ” वहिनींचें तें भाषण रागांतहि होतें आणि लोभांतहि होतें; आणि मला त्या वेळेला लिमलेटची वडी खातांना जशी गंमत वाटते, तशी वाटत होती ! लिमलेट आंबटहि लागतें आणि गोडहि लागतें.

नंतर 'समजावणी' संपली. दादा आणि वहिनींचे वडील पुढें चालत होते आणि मी आपली छत्री उघडून वहिनींच्यावर धरीत वहिनींना सावलींतून घेऊन चाललों होतों ! रस्त्यानें तुटक वाक्यांत आम्ही काय गंमतींत बोलत चाललों होतों !

हमखास दर सणावारीं मला त्या प्रसंगाची आठवण होते. आणि मग मी मनाची कालवाकालव नाहींशी करण्याकरितां खिडकींत जाऊन बसतों; आणि उन्हातान्हांतून जेवण्याकरितां सासरहून माहेरीं चाललेल्या कांहीं माहेरवाशिणी माझ्या दृष्टीस पडतात. त्या माहेवाशिणींत साधारण आमच्या वहिनींच्या चेहऱ्याची एखादी माहेरवाशीण मला दिसली, कीं मनाला थोडासा संतोष वाटतो !

× × ×

नंतर बरीच वर्षे अशीं गेलीं, कीं कशीं गेलीं हें आमच्या लक्षांतच आलें नाहीं ! यंदाच मी बी. ए. झालों होतों. आमचा दादा म्हणजे नंबर एकचा संसारी मनुष्य होता. आम्हीं दूधदुभत्याकरितां एक म्हैस बाळगली होती.

हल्लीं माझ्या लग्नाची चळवळ चालू झाली होती. आमच्या वहिनी सुस्वरूप पण ठेंगू होत्या. परिस्थिति जसजशी अनुकूल होत जाते, तसतसा माणसाचा चोखंदळपणा वाढत जातो, तसें माझें झालें होतें; पांचपन्नास मुली आम्हीं पाहिल्या, पण मला

मुलगी पसंत पडेना. अखेर शेवटीं या फार्सीला वहिनी कंटाळल्या व मला म्हणाल्या, " भाउजी, फार आवडनिवड चालवली आहे ? अखेर शेवटीं एखादी अशीतशीच मुलगी गळ्यात बांधीन हं-आतां मी नाहीं बाई मुलगी पाहायला जाणार- तुम्हीच पसंत करा आणि सांगा आम्हांला ! "

मीं थट्टेखोरपणानें म्हटलें, " वहिनी-ए वहिनी, आतां ठरलं हं. आतां जी मुलगी सांगून येईल ती पास मला-अगदीं तूं म्हणत असशील तर पाहायलासुद्धां जाणार नाहीं मी ! "

" अखेर नशिबावरच हवाला ना ? " वहिनी म्हणाल्या.

* * *

नेहमीं असेंच होतें असें नव्हे; पण त्या वेळेला तसें झालें ! वहिनींचा आणि आमचा वरील संवाद झाल्यानंतर मला पहिल्यांदां जी मुलगी सांगून आली, तीच मला पसंत पडली ! मीं वहिनींना म्हटलें, " वहिनी, आतां तूं ये जा पाहून ! नाहीं तर आतांपर्यंत मी नकार देत आलों, आतां तूं नापास कर मुलगी—"

" हो, ज्याची त्याला पसंत असल्यानंतर-आमचं हो काय-तुम्हांला पसंत ती आम्हाला पसंत ! पाहायला जायचीसुद्धां कांहीं जरूर नाहीं ! पसंत आहेत आम्हांला आमच्या जाऊबाई बरं कां, भाउजी ! "

आणखी बराच आग्रह केल्यानंतर आमच्या वहिनी मुलगी पाहून आल्या. त्या वेळीं दादा आणि मी माझ्या बसायच्या खोलींत- लग्नासंबंधींच कांहीं तरी बोलत होतों. इतक्यांत वहिनी आल्या. आल्या त्या हंसतच आल्या; आणि जणूं काय माझें तोंड वहिनी आज पहिल्यांदाच पाहत आहेत, अशा थाटानें माझ्याकडे रोखून पाहात त्या काय मिस्किलपणानें हंसल्या पण !

त्यांचें त्या जातीचें हंसे मीं आजपर्यंत पाहिलें नव्हतें !

कसें वर्णन करूं बरें त्या हंसण्याचें ? उपमा बरोबर बसत नाहीं; पण साधारण कल्पना यावी अशा तऱ्हेचं कांहीं तरी वर्णन करतों.

आयुष्यांत कांहीं कांहीं विशेष सुखाच्या घटका अशा असतात कीं, त्या प्रत्येकाच्या आयुष्यांत एकेकदां यायच्याच असतात ! आणि आपली अशी सुखाची घटका आपल्या हातून निसटली, तरी त्याची आपल्याला आठवण मरेपर्यंत नव्यासारखी राहते ! नंतर तीच सुखाची घटका आपल्या आप्तेष्टांपैकीं-मित्रांपैकीं–कुणाच्या तरी आयुष्यांत चालू झाली कीं, आपण त्या माणसांकडे–मत्सरी नव्हे–पण मिस्किलपणानें पाहतों व हंसतों ! आपण त्या वेळीं मनांत म्हणत असतों कीं, “ बेट्या, आम्हींहि ती लज्जत जाणतों. तुलाच त्याचें एवढें स्तोम नको वाटायला–अरे कांहीं नाहीं, गंमत आहे ! ”

कांहीं जमत नाहीं बुवा वर्णन करण्याचें ! देतों आतां अर्धवटच सोडून झालें !

वहिनींच्या डोळ्यांसमोर कदाचित् त्यांच्या लग्नाच्या ठरवाठरवीचे जुने प्रसंग नाचत असतील ! पण वहिनी स्त्री, मी पुरुष–काय साम्य त्यांच्या आणि माझ्या लग्नप्रसंगींच्या मनःस्थितींत !

अरे हो ! लग्न म्हणजे ‘साखरेचा’ प्रसंग ! तो स्त्रीनें चाखला काय आणि पुरुषानें चाखला काय–गोडी एकच !

आणि हेंच का वहिनींच्या मिस्किल हंसण्याचें कारण ?

पण वहिनींचें मिस्किल हंसणें पाहून मी लाजलों एवढें मात्र खरें ! वहिनींशीं मी कांहींच बोललों नाहीं !

नंतर आरती ओवाळतात ना, तसे हात माझ्यापुढें ओवाळीत वहिनी म्हणाल्या, “ अहाहा ! काय पण पारख ! इतक्या मुली पाहतां पाहतां, नापास करतां करतां–हीच ना मुलगी अखेर पास केलीत ! काय मेला–उंचच उंच शेकाटा नुसता ! ”

असें ते वहिनीच्या तोंडचें माझ्या प्रियेचें वर्णन चालू होतांच— माझ्यासमोर त्या वेळेला आरसा नव्हता, नाहीं तर त्या वेळेला माझ्या गालांवर कोणतीं फुलें फुललीं— कपाळावर कोण कालीन प्रभा चमकूं लागली, आणखी काय काय उल्कापात झाले, तें साद्यंत सांगितलें असतें !

वहिनी पुन्हा म्हणाल्या, " भाउजी, या उंचच उंच शेकाट्याशीं का लग्न करणार तुम्ही ? "

आमच्या वहिनी जात्याच ठेंगू होत्या हें अगोदर सांगितलें आहेच ! तेव्हां मी म्हणालों, " केवळ तुमच्या सोईकरितां मी तिच्याशीं लग्न करणार आहे ! कारण तुम्ही या अशा ठेंगू. जरा कुठं फळीवरचं सामान काढायचं झालं, कीं तुम्हांला कोण त्रास पडतो ! तें स्टूल आणा, नाहीं तर आम्हांला कुणाला तरी हांक मारा—वगैरे धडपड प्रत्येक वेळेला करावी लागण्यापेक्षां, आपली चालती-बोलती शिडी तुमच्या हाताशीं सदैव असावी, म्हणून मी ही मुलगी पत्करणार आहे ! आणि त्यांतून तुम्हांला नसली पसंत, तर नकार देऊन टाकूं—आपल्याला काय ? "

" कुणाकरतां ? माझ्याकरतां का नकार देणार आपण ? नको गऽ बाई ! तुमच्या मनाप्रमाणं सर्व होऊं द्या आणि सुखानं संसार करा ! " आमच्या वहिनींच्या अंगीं अलीकडे फार पोक्तपणा आला होता !

आणि अखेर तेंच लग्न ठरलें. आमची सासुरवाडी आमच्यापेक्षां जरा जास्त श्रीमंत आणि सुखी होती ! कांहीं कांहीं गोष्टी या आपल्याला फार उशिरां कळतात म्हणून नंतर पश्चात्ताप करा-वयाची वेळ येते ! आमच्या सासऱ्यांनीं 'आहे मुलगा शिकलेला, तरतरीत व हुशार' असा मनांत विचार करून मला आपली मुलगी देऊं केली होती; पण आमच्या सासूबाईंचे विचार अगदीं

निराळे होते. 'मनासारखं स्थळ आज आपण इतके दिवस शोधतों आहोंत. पण कुठं मिळत आहे? आणि पोरीला तरी लग्नाची आणखी किती दिवस ठेवायची? तेव्हां मिळतं आहे हें बरंच म्हणावं, आणि द्यावी मुलगी. झालं! तरी हें बरं आहे कीं. घरांत माणसं बेताचींच आहेत! तसं पाहूला गेलं, तर खरं कुणीच नाहीं! अहो, शिकलेलीं मुलं आतां हीं! लग्न झाल्यानंतर फार दिवस का एकत्र राह्यचीं आहेत! आणि आपली ही प्रभावती हां हां म्हणतां नवऱ्याला हातांत घेईल!'

पण लग्नांत आमच्या सासुरवाडच्या माणसांनीं काय हुतुतु घातला तो आमचा आम्हांला माहीत!

आमचें सातशें रुपये हुंडा घ्यावयाचें ठरलें होतें. (खरी हकीकत लिहीत आहें, म्हणून हें कबूल करावें लागत आहे. नाहीं तर गोष्टीं-तल्या 'मी'नीं तो हुंडा कधींच घेतला नसता. आणि मींहि गोष्टींत घेतला नसता. पण खऱ्या हकीकती देण्याचें मीं पहिल्यापासून ठरविलें आहे.) नंतर कुणाकडून काय कानगी मिळाली कुणास ठाऊक! आमचा सासरा तसा सज्जन, पण हुंडा देण्याच्या वेळेस त्यांनीं आमच्या दादाला एकीकडे बोलावून घेतला आणि त्याला सांगितलें, "हें पाहा, हुंड्याची रक्कम रोख देणं जरा आम्हांला तूर्त जड आहे. तेव्हां हुंड्याच्या रकमेइतक्या किंमतीचा कांहीं ऐवजच आम्ही जांवयाच्या आणि मुलीच्या अंगावर घालूं!" आमच्या दादालाहि कांहीं तरी कळत होतेंच! तो हें असें कां म्हणत आहेत, हें पूर्णपणें समजून चुकला. त्यानें वहिनींनाहि हा मजकूर सांगितला. वहिनींनीं सल्ला दिला. 'म्हणावं, तुम्हांला हवं तें करा! आमची कांहीं तक्रार नाहीं!'

आमचा दादा तसा संतापी स्वभावाचा, पण शांतपणें त्यानें माझ्या सासऱ्याच्या म्हणण्याला कबुली दिली!

त्यामुळें आमच्या सासुरवाडीचीं माणसें फारच शेफारून गेलीं! नंतर ते कोणत्याहि बाबतींत दादाला कांहींच विचारीनात! जे ते मला येऊन विचारूं लागले. मी म्हणे. "मला यांत कांहीं समजत नाहीं, तुम्ही आमच्या दादांना विचारा!" पण दादानें मला बजाविलें कीं, "भाऊ. आतां आपला हट्ट कांहीं चालवायचा नाहीं—विनाकारण तंटेबखेडे कशाला— त्यांना हवं तसं नाचूं दे! आपल्याला चांगलीं माणसं मिळालीं नाहींत; नशिब आपलं!"

वहिनींनींहि मला हाच गुरुमंत्र दिला! सबंध लग्नांत त्या अगदीं तिऱ्हाइतासारखं वागल्या. शेवटीं मांडवपरतण्याच्या दिवशीं तर दादा व वहिनी जेवायलाहि आलीं नाहींत आणि त्यांना कोणीं आग्रह-हि केला नाहीं!

त्यामुळें लग्नाचा सोहाळा मला तितकासा आनंददायक वाटला नाहीं! सोहाळे सर्व झाले, पण त्यावर विषण्णतेचें रखरखलेलें ऊन्ह सुरुवातीपासून अखेरपर्यंत होतें! भर उन्हांत अनवाणी उभें करून 'आइस्क्रीम' खायला मिळावें तशी माझी अवस्था झाली होती!

लग्नांतल्या शेवटच्या दिवसाची जर मीं एक गंमत सांगितली तर ती कांहींना अतिशयोक्तीची व कांहींना वर्णनांतली वाटेल.

आमच्या मेहुण्यांनीं 'पुढें काय करणार?' म्हणून विचारलें. मीं सांगितलें, "आतां कुठं तरी नोकरीच पाहणार!"

नंतर आमचे मेहुणे म्हणाले, "नोकरी लागल्यानंतर बिऱ्हाड निराळंच करणार ना? आमची प्रभा तशी हुशार आहे—नवरा-बायकोचा संसार अगदीं छान थाटील!"

नवरा-बायकोचा संसार! मला कळेना! मीं यांच्या बहिणीशीं लग्न केलें आहे, कीं यांनीं मला 'दत्तक' घेतलें आहे? तरी बरें मला आणखी नातेवाईक फारसे कुणी नव्हतेच!

पण त्या दिवसापासून मात्र आमच्या संसाराला एककली सूर

लागले गेले हें मला कळून आलें ! वहिनी व दादा तस मानी—ते अंग खुशाल झाडून मोकळे होतील, पण—ज्यांच्या मायेची शाल-दुशाल पांघरून मी आजचा दिवस आनंदानें पाहात आहे—त्यांचें—छे: ! मला कल्पनाच सहन होईना !

आमच्या सौभाग्यवती आमच्या घरीं येऊन राहिल्या.

आतां एकदां हिचे सर्व विचार समजावून घ्यावे या उद्देशानें मीं आपले विचार झांकून टाकले आणि तिच्या कलानें बोलूं-वागूं लागलों. आठपंधरा दिवसांत खालील विचाररत्नें मीं गोळा केलीं.

" इश्श—अगदींच बाई अडाणी आणि रानवट माणसं—म्हशीचा शेणगोठा आपण पांढरपेशा माणसांनीं का करीत बसायचा ? आमच्या शेजारीं डेअरी आहे. साडेतीन शेरानं अगदीं कोरं दूध घालतो हो तो ! आमच्या घरीं त्याचाच रतीब आहे—आपल्या घरीं सुद्धां तो घालील ! "

" इश्श ! आणि धुणं-भांडीं कसलीं ! घरांत मोलकरीण नाहीं का ठेवतां येत ? मी नाहीं बाई कधीं भांडीं वगैरे घांसणार—वाटल्यास आपण मोलकरीण ठेवावी—तिचे पैसे वाटल्यास मी माहेरहून आणीत जाईन ! "

" मला नाहीं बाई जाऊबाईचा स्वभाव पटत ! इश्श ! आणि अरे जारे म्हणतात त्या आपल्याला ! शोभतं का त्यांना तरी हें ? मला बाई असा राग येतो त्यांचा अशा वेळीं—पण आपणच मुकाट्यानं ऐकून घेतां, तेव्हां मी काय करणार ? "

" इश्श ! कसली बाई जागा ही ! मेला गोठा बरा त्यापेक्षां—आमच्या घराजवळ किनई, ती नवीन चाळ झालीय् ना ? काय छान जागा आहे—इलेक्ट्रिक लाइट—जिकडे तिकडे फरशी—बाहेर सज्जा—पण आपण मनावर घ्याल तेव्हां ना ! इश्श ! " इथें आमच्या सौभाग्यवतीनें एक मुरका मारला.

तिचे विचार ऐकून माझ्या मनाला काय समाधान वाटलें पण ! मी मनांत म्हणालों सुद्धां, कीं बायको असावी तर ही अशी असावी !

बायको अशी असावी हें खरें— पण मला अशा विचारांची बायको नको होती ! आणि मिळाली तर ही अशी ! आतां काय करावें ?

मीं मनांत विचार केला. आजपासून आपण हिच्याशीं बोलणेंच मुळीं सोडून द्यावें ! पाहूं या काय फरक पडतो तो !

मीं आमच्या सौभाग्यवतीचे विचार आमच्या वहिनींना कळविले. त्या हंसल्या, आणि म्हणाल्या, " भाउजी, अलीकडची पिढी ही अशीच एकलकोंड्या विचारांची आहे ! आमची ना नाहीं हो—वाटल्यास आपण खुशाल वेगळं बिऱ्हाड करा—आम्ही पाहूं तरी राजा-राणीच्या संसाराचा थाटमाट ! "

" वहिनी, थट्टा पुरे करा ! आतां आपण अशी गंमत करूं— उद्यांपासून म्हशीचा शेणगोठा तिच्याकडेच— कितीहि रागावली— जाजावली तरी विचार करायचा नाहीं ! "

" भाउजी, इतकं शिकून अखेर शिक्षण वायां गेलं तुमचं— बायको आलेली असून भावजयीच्या नादानं वागायचं—अगदीं रानटीपणाचं लक्षण आहे हें ! पाहा हो, आपला आतांच नीट विचार करा— नाहीं तर आपली राणी म्हणेल कीं, आमच्या जाऊ-बाईनीं आमच्यांत वितुष्ट कालवलं म्हणून ! "

" हो-हो, पुरता विचार केला आहे. आतां खिजवूं नकोस मला आणखी ! "

" भाउजी, बाहेर पाहिलंत का ? "

मीं खुणेनेंच विचारलें, " काय ? "

" आपल्या सौभाग्यवंती आपलं गुप्त खलबत चोरून ऐकताहेत !"

तिला ही संवय आहे, हें पूर्णपणें माझ्या लक्षांत आलें होतें. मी खजील झालों आणि बाहेर निघून गेलों.

माझी सौभाग्यवती– माझ्या वहिनीकडे मारक्या म्हशीसारखी पाहात होती !

रसिकांनो ! माफ करा ! मी बायकोला म्हशीची उपमा देत आहे; पण ही गोष्ट काल्पनिक नसल्यामुळें खरें बोलायला पाहिजे !

दुसऱ्या दिवसापासून म्हशीचा शेणगोठा माझी बायकोच करूं लागली. दोनचार दिवसांत आणखी एक गंमत झाली. एक दिवस सकाळींच माझे मेहुणे माझ्याकडे येत होते. वहिनीनें तें पाहिलें आणि मिस्किलपणानें मला कांहीं खूण केली. मी समजलों. मी झटकन् घरांत जाऊन पंचा नेसलों आणि हातीं खराटा घेऊन शेणगोठा करायला मुद्दाम निघालों. मी गोठ्यांत जातों तों आमचे मेहुणे आले. मीं म्हशीच्या पाठीवर थाप मारून हंसत म्हटलें, " या हो ! वेलकम् ! बसा, जरा--दूध काढून येतों ! "

हें सर्व दृश्य पाहून आमच्या सौभाग्यवतीच्या अंगाचा असा तिळपापड झाला, कीं कांहीं विचारूं नका ! आमच्या मेहुण्यांनीं तर नाकाला रुमालच लावला ! आणि मी रानटी मोकळेपणानें खूप हंसलों !

मेहुणे मला जेवायला बोलवायला आले होते.

मीं साफ नकार दिला.

" बरं, आमच्या बहिणीला तरी धाडा–" मेहुणे म्हणाले. मीं म्हटलें, " आम्हीं आमच्या घरांत हल्लीं स्वातंत्र्य पुकारलं आहे ! ज्याचा तो मालक ! वाटेल त्यानं वाटेल तें करावं ! तिचं बोलावणं तिच्याजवळ करा ! रागानं नाहीं हो हें मी सांगत–ही एक नवी सिस्टिम मला प्रचारांत आणून पाह्यची आहे ! "

मेहुणेः—वा ! असं कसं होईल—

मीः—कसं होईल तेंच मी पाहणार आहे! तिला घरांत माणसं आवडत नाहींत—मला माणसांवांचून करमत नाहीं! आमच्या वहिनीला विचारून तिला कोणतीहि गोष्ट करायचं कमीपणाचं वाटतं. पण नात्यानं ती जरी माझी वहिनी असली, तरी ती मला आईसारखी आहे! वेगळं राहण्याबद्दल आमच्या बायकोचा मानस आहे—मला तें परवडत नाहीं— म्हणून असं ठरवलं आहे. ज्याचा तो स्वतंत्र!

असें म्हणून मीं धार काढण्यास आरंभ केला.

आमची सौभाग्यवती बाहेर बाहेरच घोटाळत होती. दोघेंहि बहीणभावंडें दरवाजांत गेलीं. आमच्या सौभाग्यवतीचे डोळे पाण्यानें भरले होते.

" काय, कसं काय ? "

" कांहीं नाहीं, ठीक आहे! " ठीक आहे या म्हणण्याच्या साथीला डोळ्यांत पाणी हजर होतेंच!

त्या दिवशीं रात्रीची गोष्ट.

" इश्श ! माझ्याशीं बोलायचं नाहीं का ? "

" आपल्याशीं बोलायची माझी लायकी नाहीं ! "

" हें काय, कांहींतरीच बोलायचं तें ! "

" कांहीं तरीच काय, आपल्या मनासारखंच बोलतों आहे मी ! "

" इश्श, मी चुकलें ! आपल्या मनासारखी वागेन मी आतां. "

मलाहि आतां जास्त अंत पाहणें बरें वाटलें नाहीं. मीं समजुतीनें घेतलें व नंतर हंसत तिला सहज विचारलें, " आतां मी खोचून विचारीत नाहीं माझ्या वहिनींत तुला काय दोष दिसले ? "

" असं कधीं म्हटलं का मीं ? "

" मग स्वतंत्रपणाची भाषा कां ? "

" चुकलें म्हणून एकदां कबूल केलं ना मीं ? "

संपलें! त्या दिवसापासून पुन्हा सर्व सुरळीत चालूं लागले. आमच्या घरांत फूट पडेल असें वाटलें होतें, पण तसा योग आला नाहीं! या सर्व वादळांत आमच्या वहिनींची वागणूक मोठी अभ्यास करण्यासारखी होती!

आमच्या वहिनींनीं एकदां पाहिलें कीं– बुद्धि अगदीं स्वतंत्र आहे– आपण बोलायला जाऊं, तर आपलीच शोभा होणार! सासूच्या हाताखालीं सुनेनें वागावें, अशा आर्जवी पद्धतीनें आमच्या वहिनी माझ्या बायकोशीं वागत असत! आमच्या वहिनींची सर्वच वागणूक अशी असे कीं, कुणाच्या डोळ्यांत रुतायची नाहीं, खुपायची नाहीं!

माझ्या मनांत एक चमत्कारिक कोडें नेहमीं घोळत असतें आणि तें म्हणजे चांगलीं माणसें– आनंदी माणसें सर्वत्र सुखी कां असूं नयेत? पूर्वजन्म– पुढील जन्म– आपल्याला समजायचें नाहीं त्यांत कांहीं!

आपण माणसाच्या कृतीवरून त्याच्या स्वभावाची, शीलाची कल्पना करतों! पण त्याचें मन? मन निर्मळ असतेंच म्हणून कसें सांगावें? वाईट विचार मनांत येत नसतील का? अर्थात् त्याच्या मनांत वाईट विचार रुजत नसतील–आणि वाईट विचारांचीं फळेंहि त्याला येणार नाहींत–पण चुकून आलेले व आंतल्या आंत दडपलेले वाईट विचार मनाचें खंबीरत्व कमी करणार नाहींत का? मनाला थोडेंसें तरी मालिन्य येईल कीं नाहीं?

छेः! अतिविचार आणि अविचार दोन्ही वाईटच!

कशावरून बरें हे विचार सुचले मला? हां—आमच्या वहिनी त्या वेळेला अपुऱ्या दिवसांच्या बाळंतीण झाल्या होत्या!– मुलगा झाला होता त्यांना– पण पुत्रप्राप्तीच्या आणि पुत्रहानीच्या दोन्ही वेदना कांहीं मिनिटांच्या अंतरानेंच त्यांना सोसाव्या लागल्या!

आमच्या वहिनींच्यापुढें देवानें फारसेच केला ! सुईणीनें मुलगा पुढें केला— काय नाक-डोळे तरतरीत !

तरतरीत डोळे मिटले गेले—दादांनीं डोळे पुसत पुसत पांचच मिनिटांनीं म्हटलें, " आण त्याला इकडे ! "

इकडचा मुलगा तिकडे झाला ! एका खळगींतून बाहेर आला आणि दुसऱ्या खळगींत पुरला गेला !

त्याचें नांव काय ? त्याचें काम काय ? आमच्या दादा-वहिनींना त्याचा उपयोग नुसता तुरटीच्या खड्यासारखा झाला ! तुरटीचा खडा डोळ्यांतून फिरवला म्हणजे डोळे साफ होतात—डोळ्यांतून पाणी येतें——

त्याप्रमाणें दादा-वहिनींच्या डोळ्यांत तो तुरटीप्रमाणें बोचला— त्यांच्या डोळ्यांतून पाणी आलें आणि डोळे साफ झाल्याप्रमाणें त्यांच्या दृष्टींत फरक पडला ! कालचेंच जग ते आज पाहात होते— पण जगाकडे पाहण्याची त्यांची आजची दृष्टि अगदींच निराळी होती !

वहिनींच्या आणखी अशाच दोन खेपा झाल्या ! तरीहि वहिनीं-च्या आनंदी वृत्तींत कांहींच फेरबदल पडलेला नव्हता !

मला एक मुलगा झाला. मनावर कांहीं संस्कार कसे वज्रलेप असतात पाहा ! माझ्या मुलाचें वर्णन करण्यांत मला संकोचल्या-सारखें वाटतें आहे !

होता आपला देवाघरचा प्राणी ! वहिनींच्या गळ्यांतील ताईत ! बिचारा आईपेक्षां वहिनींजवळच फार असे !

पण त्यामुळें आमच्या सौभाग्यवतीच्या अंगांत पुन्हा भूत संचारल्यासारखें झालें ! आमच्या सौभाग्यवती मला म्हणत, " इश्श, इतका कसला भोळा स्वभाव आपला ! वहिनी कांहीं ह्याच्याकडे चांगल्या नजरेनं पाहात नाहींत ! त्यांचीं पोरं जगत

नाहींत, त्याला आम्ही काय करणार? म्हणून माझ्या पोराचा दुष्टावा? पाहा–परवां एकसारखा त्यांच्याजवळ होता–काल कांहीं प्यायला नाहीं हा! तेव्हां त्या देवाला गेल्यावर मीं दृष्ट काढली–तेव्हां कुठं पिऊं लागला! तेव्हां पाहा, असली पोराची गरज तर करा कांहीं तरी बंदोबस्त!"

माझ्या डोळ्यांसमोर दोन स्त्रिया उभ्या राहिल्या. एक माझी सौभाग्यवती आणि दुसऱ्या माझ्या वहिनी! दोघींचाहि माझ्या जिवाशीं जिव्हाळ्याचा संबंध! माझें मन उदास झालें. माझ्या मनांत आलें, मी स्त्रीजातीबद्दल वाईट कोणत्या तोंडानें बोलूं आणि चांगलें कोणत्या तोंडानें बोलूं?

कोणी म्हणेल, माझ्या बायकोकडे पाहण्याचा माझा दृष्टिकोणच सदोष असेल–पण असें म्हणणाराला मी तरी काय सांगूं? मनुष्य आपला आपल्यालाच शिव्या घेऊं लागला, म्हणजे निदान त्याचे स्वत:चे दुर्गुण त्याचे त्याला पुष्कळसे झोंबलेले असतीलच ना! माझ्या बायकोला आणि मीच नांवें ठेवतों आहे–माझी बायको चांगली दिसावी– उदात्त विचारांची वाटावी म्हणून मीं 'तिच्याहि दृष्टीनें' परिस्थितीचा विचार करून पाहिला; पण सर्व एकलकोंडे विचार–मी–मी–मी! वरचष्मा कुणाचाहि नको! आणि कुणाबद्दल कशावरनं तरी उगाचच काहूर!

मी म्हणालों, "वहिनीनं माझा मुलगा घेतला म्हणून त्याला दृष्ट लागते, मग त्याच्या आईचीच– तुझीच दृष्ट लागली नसेल म्हणून कशावरून? माझी लागली नसेल म्हणून कशावरून?–"

आमची ती:–"इश्श! आपल्याच माणसांची कुठं दृष्ट लागते का?"

मी—"मग वहिनी लोक आहे का? आणि आपलींच माणसं याचा अर्थ जर फक्त तूं आणि मी असा असला तर–आपली तरी

दृष्ट कां न लागावी ? समज, तुझ्या किंवा माझ्या हातून पोराला अफू जास्त गेली—तर तूं आणि मी अगदीं त्याचीं माणसं असलों तरी पोराचा प्राण जायचा राहील का ?"

"हें पाहा,—आपण वाटेल तसं वागा—पण बाळाबद्दल असलं अभद्र बोलूं नका बाई ! इश्श—कांहीं जिभेला हाड ! अहाहा !" म्हणून मुलाला कवटाळून त्याचा मुका घेत माझी बायको बाहेर पडली आणि आमची ती कलकल ऐकल्यामुळेंच कीं काय आमच्या वहिनी तिथें आल्या.

"काय भाउजी, आज कांहीं नवीन आख्यान आहे वाटतं ?" वहिनीनें सहज विचारलें. मीं भोळेपणानें सहज सांगितलें. पण त्यामुळें वहिनींच्या हृदयाला स्वाभिमानाची तेढ बसली.

आणि कां बसूं नये ? चूक माझी होती. अगदीं 'मोकळें अंतःकरण' याचा अर्थ कांहीं असा नव्हे. 'तूं मुलाला घेतलंस म्हणून पोराला दृष्ट लागते' असं माझी बायको म्हणते." हें माझ्या बायकोनें जरी गाढवपणानें म्हटलें असलें, तरी मीं शहाणा होतों ना—? मग हें विष कसें मीं वहिनीकडे पोहोंचतें केलें—? पण या विचारांच्या शहाणपणाचा आतां काय फायदा होता ? वहिनीनें हंसत हंसत माझें भाषण ऐकून घेतलें. ऐकलें न ऐकलेंसें केलें आणि दुसऱ्याच कोणत्या तरी विषयावर चार शब्द बोलून त्या निघून गेल्या !

पुढें दोनचार दिवसांतच वहिनींनीं माझ्या मुलावरची माया निष्ठुरपणानें काढून घ्यायला सुरुवात केल्याचें मला आढळून आलें !

एक दिवस काय झालें, माझी बायको इकडेतिकडे कुठेंतरी जवळपासच गेली होती. वहिनी आपल्या खोलींत बसल्या होत्या, आणि माझा बाळ खालीं लगतच्याच ओटीवर रांगत होता. वहिनी अलीकडे फारशा कुणाशींच बोलत नसत. त्या आपल्याच जिवाशीं

हंसत-खेळत; आणि दुपारच्या वेळेस थोडी स्वस्थता मिळाली कीं, दासबोध नाहीं तर नवनीत घेऊन वाचीत बसत !

आतां त्या पाटावर तांदूळ घेऊन निवडीत बसल्या होत्या; आणि निवडलेले तांदूळ खालीं सुपांत टाकतां टाकतां त्या तोंडानें गुणगुणूं लागल्या—

गंगोत्री केदार बद्रीनारायण । पाहूं चला हो कसें ॥
हिमालयाचें सुंदर वारें । गार शरीरा लागतसे रे बा ॥
थंड शरीरा लागतसे ॥ ध्रु०॥
हरिद्वार हें द्वार हरीचें । प्रथम करुनियां तीर्थविधि ।
पिंडदान आणि ब्राह्मणभोजन । गंगापूजन यथाविधि ।—
गंगोत्री केदार बद्रीनारायण । पाहूं चला हो कसे ॥

आणि इतकें म्हणून त्या स्तब्धपणानें पाटावरच्या तांदळांकडे पाहात राहिल्या !

हिंदु मनाची एक गंमत मोठी पाहण्यासारखी असते ! तें कितीहि सुधारक असो, दुर्धारक असो– तोंडानें वाटेल तें भको, पण केळीचे खांब, लावलेलें निरांजन, समई, गंधाक्षता या जिन्नसा पाहिल्या कीं, कितीहि खडकाळ मन असो, त्याला आर्द्रता येते ! तसेच कांहीं कांहीं शब्द असे आहेत कीं, ते शब्द– संदर्भाशिवाय जरी बोलले गेले, तरी मनाला कांहीं तरी उदात्तता प्राप्त होतेच ! उदाहरणार्थ– हरिद्वार–कैलास–श्रीरंग–विटेवरी उभा—परब्रह्म— परमार्थ–ब्रह्मार्पण—!

ह्या शब्दांचा अर्थ प्रत्येकाला कळत असतोच, असें नव्हे; पण अर्थ न कळतांहि मनाला गंमत वाटते ! फुलांचा वास घ्यायला कुणाला शिकवावें लागत नाहीं. तसेंच वरील शब्दांचेंहि आहे.

त्याचप्रमाणें वरील गाणें म्हणण्याला सुरुवात करण्यापूर्वी वहिनींचा चेहरा किंचित् उदास होता, पण—

" हिमाळयाचें सुंदर वारें । गार शरीरा लागतसे रे बा।
थंड शरीरा लागतसे । "

—कोमेजूं पाहणाऱ्या फुलांवर जसें फुलानेंच पाणी शिंपडावें म्हणजे जशीं तीं फुलें लगेच तजेला धारण करतात, त्याप्रमाणें आमच्या वहिनींच्या तोंडावर लगेच उल्हासाचा तजेला आला !

आणि बाहेर ओटीवर—

वहिनींचा शब्द माझ्या बाळाच्या कानांवर आज तीन-चार दिवसांत आला नव्हता—म्हणून तो आधींच कावराबावरा झाला होता. त्याच्या कानांवर वहिनींच्या तोंडचें 'हिमालयाचें सुंदर वारें, हरिद्वार तें द्वार हरीचें' वगैरे शब्द आले—आणि तो चाहूल घेऊं लागला.

कुठें—? कुठं आहे ? ! अरेच्या ! दिसत तर कुठेंच नाहीं ! ! !

माझा बाळ ओटीवरच गिरक्या मारूं लागला—

छे कुठेंच दिसत नाहीं— आणि सहज तो खोलींत डोकावला. तों काय—त्याचा हरवलेला आनंद—

पण—

बाळानें आपल्याकडे पाहिलें असें पाहून वहिनींनीं बसल्या जागेवरूनच दार ढकललें. मीं हें सर्व लांबून पाहात होतों. मला विलक्षण गहिंवर आला-- .

बाळ दार ठोठावूं लागला--आणि तोंडावर हिरमुसलें हंसें दिसत होतें--तोंडानें बालसंगीत चालू होतें !

मी लपत-छपत ओटीवर गेलों आणि दाराच्या बाजूला उभा राहून माझ्या बाळाला दार उघडून दिलें—बाळ झपाट्यासरसा आंत गेला—पण वहिनीनें डाव्या हातानें त्याला थोपवून धरलें आणि म्हणाल्या, " बाळ—आंत नाहीं हं यायचं ? बाळाची आई

कुठं गेली--? जा--जा नको ! माझ्याकडे पाहून गळा पुन्हा भुरळांत नाहीं हं पाडायचं—"

बाळ भाषा शिकलाच नव्हता, तर त्याला समजणार तरी काय आणि तो उत्तर तरी काय देणार ?

अखेर वहिनींनीं त्याला उचललें, ओटीवर आणून ठेवलें आणि त्याच्यापुढें खेळणें–खुळखुळा टाकून त्याची नजर चुकवून त्या खोलींत जाऊं लागल्या; पण बाळानें त्यांचे ओचेच धरून ठेवले !

हा सर्व प्रकार मी पाहात आहे, हें आमच्या वहिनींच्या लक्षांतहि आलें नव्हतें ! त्या बाळाला सोडविण्याचा प्रयत्न करीत, आणि बाळ त्यांना ऐकत नव्हता !

आणि असलीं उदाहरणें कुशलतेनें सोडाविणें याचेंच नांव संसार! नाहीं तर वहिनींनीं दोन चापट्या बाळाला मारल्या असत्या, कीं झालें होतें काम !

घरांतलें मांजर पायांतल्या पायांत घोटाळूं लागलें, कीं आपण नाहीं का त्याला एका हिसड्यासरखें बाजूला करीत ?

इतक्यांत आमच्या सौभाग्यवती तेथें आल्या, वहिनी आंत निघून गेल्या–सौभाग्यवतीनें बाळाला उचललें; पण तो रडत होता– त्याला वहिनींच्याकडे जायचें होतें !

माझ्या बायकोचें लक्ष माझ्याकडे गेलें. मला पाहून तिला स्वतःच्या बाळाचें जास्तच कौतुक वाटलें. ती माझ्याकडे अभिमानानें पाहात म्हणाली, " बाळ किनई– आज दोन-चार दिवस फार किरकिर करतोय्– आपण तरी घ्या ना त्याला ! "

मी निष्ठुरतेनें म्हणालों, " नको, माझी दृष्ट लागेल त्याला ? मी त्याला आज दोन-तीन दिवस एकसारखा घेतों आहे– म्हणूनच तो आज किरकिर करीत असावा ! तूंच घेऊन फिर त्याला ! मी करतों घरांतलें कामकाज."

" असें हो काय तुम्ही सर्वजण मला आणि माझ्या बाळाला पाण्यांत पाहतां—" आणि नंतर पुष्कळशी तोंडांतल्या तोंडांत पुटपुट !

" हो, जगांत जन्माला आलेलं हें पहिलंच बालक—तेव्हां प्रत्येकजण मत्सर करणारच त्याचा ! " नंतर मी चिडून म्हणालों, " चांडाळणी ! आण त्याला इकडे—तूं त्याची आई नाहींस—दाई आहेस नुसती ! " मीं पटकन् बाळाला घेतलें आणि ओटीवरूनच ओरडलों, " वहिनी— ए वहिनी— अहो वहिनी, मुकाट्यानं बाहेर या ! "

वहिनी कावऱ्याबावऱ्या बाहेर आल्या आणि म्हणाल्या, " भाउजी, कशाला हाक मारलीत ? "

मी गहिंवरून म्हणालों, " वहिनी—ए आई, माझ्यावरची आणि माझ्या बाळावरची माया अशी काढून घेऊं नकोस—वहिनी, मी भाबडा आहे—सगळं मोकळ्या मनानं बोलतों मी तुझ्याजवळ ! म्हणून का तूं अशी निष्ठुर झालीस ? तें कांहीं नाहीं. घे—घे या बाळाला आणि मला वचन दे, कीं मघांपासून जसं तूं त्याच्याशीं निष्ठुर वर्तन केलंस, तसं यापुढं कधींहि करणार नाहीं ! "

वहिनी म्हणाल्या, " भाउजी—"

वहिनी, एक शब्दहि बोलूं नकोस—अगोदर याला घे आणि मग सगळं ! "

" पण— बाळ माझ्यापेक्षांहि मायेच्या ठिकाणीं आहे ! तिथंच तो चांगला दिसतो आहे ! भाउजी, त्रागा काय करतां वेड्यासारखा ? अहो, माझ्या नशिबीं नाहीं तें सुख ! कुणाचं सुख भोगायचं नशीब असतं—कुणाच्या नशिबीं दुसरीं सुखांत असलेलीं लांबून पाह्यच असतं ! आणि खरं सांगूं का भाउजी— दोन्हींतहि सुख सारखंच असतं ! तो पाहा बाळ कसा आनंदांत आहे—अरे लबांडा,

माझ्या अंगावर कशाला झेंप टाकतोस– आहेस तिथंच बरा आहेस बरं, ओवी म्हणूं का आपल्या या गुणी बाळाला—

" कचेरीच्या पुढें । हिरवा कंदील डोलतो ।
बाळ कडिये शोभतो ।—भाउजींच्या ॥

हं बाळ, हंसा,— पण तिथंच बसून हंसायचं हं ! "

मला जास्तच गहिंवरून आलें. माझ्या तोंडून शब्द फुटेना. तरी मीं म्हटलें, " वहिनी, विषय पालटून मला असं फसवूं नकोस; मी रागानं तुला विचारतों आहे– घेणार आहेस का नाहीं तूं माझ्या बाळाला ? "

वहिनी माझ्याकडे न पाहतांच म्हणाल्या, " जाऊबाई, बाळ हाक मारतोय् आपल्याला–बसा ना त्याला घेऊन–नाहीं तर हिंडवा तरी त्याला– मी करतें घरांतले केर-वारे सगळें ! "

सौभाग्यवती तेथें आली. वहिनी तेथून जाऊं लागल्या. मी ओरडलों, " वहिनी, माझ्या गळ्याची शपथ आहे एक पाऊल पुढं टाकलंस तर,–" नंतर मीं बायकोकडे वळून म्हटलें, " ए- याला दे वहिनींच्याजवळ ! "

माझ्या बायकोनें सर्व परिस्थिति लक्षांत घेतली आणि मुलाला माझ्याजवळून घेऊन वहिनींच्या हातीं देत वहिनींच्या कानांत कुजबुजल्याप्रमाणें म्हणाली, " बाई, माझी चूक झाली. मला क्षमा करा—नाहीं तर डोक्यांत राख घालून घेतील ! "

वहिनींनींहि मुकाट्यानें मुलाला घेतलें ! त्या गुलामाचा आनंद गगनांत मावेना ! तो हंसूं लागला, खिदळूं लागला ! वहिनींनींहि झालेलें सर्व विसरल्यासारखें दाखवून प्रसंग साजरा केला.

सूर्यास्त झाल्यानंतर खरा काळोख असतो; पण आपण जसे दिव्यानें कृत्रिम उजेड निर्माण करून रात्रीला शोभा आणून व्यवहार चालू करतों, त्याप्रमाणें वास्तविक आमच्या मनाची खरी प्रफुल्लता

सूर्यास्ताप्रमाणें मावळलेली होती; पण कृत्रिम हास्याचे—दिलसफाई-चे दिवे लावून— आम्ही प्रसंग साजरा करीत होतों !

नंतर आमचे तंटेबखेडे होत नाहींसे झाले. कारण, परीक्षेची तयारी झालेली नसली, म्हणजे 'नापास'चा शिक्का घेण्यापेक्षां परीक्षेला बसण्याचें जसें आपण टाळतों, त्याप्रमाणें आम्ही प्रसंगच टाळीत होतों. मग तंटेबखेडे होणार कसे? पण त्यामुळें आमच्या घराचें 'कुटुंबाचें' रूप जाऊन हल्लीं आम्ही कुटुंबांतील माणसें म्हणजे एकाच धर्मशाळेंत उतरलेल्या अनेक वाटसरूंसारखीं झालों होतों !

मनमिळाऊपणा ह्याच गुणाला मी शंभर मार्क देतों; इतर किरकोळ हजार दुर्गुण अंगांत असले, तरी एक मनमिळाऊपणा जर अंगांत असेल तर—

—पण तो नाहीं, म्हणून हल्लीं कुटुंबपद्धति— छिन्नविच्छिन्न झालेली दिसते आहे !

दादा—

होय; त्याच्याविषयीं मीं अद्याप फारसें लिहिलेलेंच नाहीं ! कारण माझ्या लग्नापासून तो घरांत अगदीं मुखस्तंभासारखाच असे ! होय नाहीं— नाहीं नाहीं— कांहीं नाहीं; घड्याळासारखा त्याच्या आयुष्याचा वर्तनक्रम होता !

त्याचा स्वभाव जरी जात्याच कमी बोलका होता, तरी त्यानें अलीकडे बोलणें इतकें कमी केलें होतें कीं, 'आमचा दादा मुका आहे कीं काय?' अशी मलाच एखाद्या वेळीं गंमतीनें शंका येई !

तो वहिनीशीं काय चार वाक्यें बोलेल तेवढींच, आणि मींच जर कांहीं आपण होऊन विचारलें, तर तेवढ्या प्रश्नांचीं उत्तरें त्याज-कडून मिळत !

दादाची शरीरप्रकृति मूळपासूनच जरा अशीतशीच. त्यांतून पुष्कळ वर्षे मायेच्या ओलाव्याशिवाय काढलेलीं– आणि आमच्या दादाचा स्वभाव थोडासा खेदी होता! कोणतीहि गोष्ट तो आपल्या मनाला लावून घेई. एखाद्या अप्राप्य गोष्टीबद्दल खेद करीत बसेल– आणि हें कुणाच्याच लक्षांत यावयाचें नाहीं– मी एवढ्या बारकाईनें सांगतों म्हणजे काय—त्याचा सख्खा भाऊ मी—इतक्या वर्षांचा निकटचा सहवास त्याचा-माझा– माझ्या हें लक्षांत येणारच!

कुणी कांहींही म्हणा, प्रत्येकानें आपल्या मनाच्या बाबतींतच विशेष मेहनत घ्यायला हवी! आपण राह्यचें घर जसें हवाशीर पाहतों, त्याप्रमाणें आपण आपल्या मनाभोंवतींहि हवाशीर वातावरण निर्माण केलें पाहिजे! आणि प्रत्येकानें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, जसें बिऱ्हाड करितांना त्यांत कांहीं तरी गैरसोय हटकून पदरांत येते—उदाहरणार्थ, एका ठिकाणीं बिऱ्हाड केलें, तर मंडई जवळ पडते, पण आप्तेष्टांचीं घरें बाजूला राहतात. बरें, आप्तेष्ट जवळ करावेत, तर रोज लागणारी मंडई लांब पडते. त्याप्रमाणें कांहीं गोष्टीच आपल्या मनाच्या आटोक्यांत राहतील; वगैरे वगैरे.

हे सर्व विचार सुचण्याचें कारण असें कीं, वास्तविक दादाच्या लग्नापासून त्याची वृत्ति खुलायला पाहिजे होती! त्याच्यांतून वहिनींसारखें रत्न त्याच्या पदरीं पडलेलें. पण नाहीं! विचार करण्याची तऱ्हाच चमत्कारिक! त्याच्या वागणुकीवरून असें वाटे कीं, याच्या मनांत हे विचार चालले असावेत कीं–" आजपर्यंत आपण असें निष्प्रेम, एकलकोंडें आयुष्य काढलें—आज आपणांपुढें सुखाचें ताट परमेश्वरानें ठेविलें आहे. तें आपणाला पचणार आहे का–? अरेच्या, आणि आपली बायको इतकी सौंदर्यवान्—इतकी

सद्गुणी—इतकी प्रेमळ—छे, देवच कांहीं तरी चुकला असेल—इतक्या सुखाला मी पात्र नाहीं !"

आणि म्हणूनच आमचा दादा संसारांत संकोचल्यासारखा वागत होता !

आणि आमच्या वहिनींचा स्वभाव मधमाशीसारखा होता ! सांपडेल तिथून निर्मल—निष्पाप आनंद गोळा करावयाचा आणि त्याचा सुगंध कुटुंबांत पसरायचा ! पण कांहींच्या नशिबीं असा आयता आनंद घेण्याचेंहि नसतें, किंवा ते घेत नाहींत ! ते नुसते सुखाचे पहारेकरी !

त्यांची त्या आनंदावर मालकी असून सुद्धां ते आपली किंमत 'इंपीरियल बँके'-भोंवतीं शस्त्र घेऊन पहारा करणाऱ्या पोलिसाइतकी समजतात ! त्यांनीं नुसता सुखाचा आवाज ऐकायचा आणि वर म्हणायचें "काय त्रास आहे हा !" आमच्या दादाची हुबेहुब तीच स्थिति होती !

अलीकडे, कां कुणास ठाऊक, पण त्याच्या मनानें घेतलें होतें कीं, आपण आतां फार थोड्या दिवसांचे सोबती आहोंत. वास्तविक तसा तो आजारी वगैरे कांहीं एक नव्हता,--पण त्याच्या मनानें तसें घेतलें होतें ! आणि आपण जर लवकर मरणार, तर आपल्या बायकोनें आपल्या अगोदर मरावें ही त्याची इच्छा ! कारण कसें सांगता येणार ! नवऱ्याच्या अगोदर बायकोनें मरावें, ही त्याची मनःप्रवृत्ति ! त्या मनःप्रवृत्तीवर व्याख्यान झोडून तरी काय होणार ?

सर्व जग कधीं सुधारणार आहे का ?

जग हें एक अपूर्ण कोडें आहे ! एकीकडून मिळतें घ्याल तर दुसरीकडे फाटेल ! प्लेगची सांथ गेली म्हणून हायसें वाटावें, तों

इन्फ्ल्युएन्झाची सांथ हजर ! जुने विवाह वाईट, म्हणून त्याची टवाळी करावी, तों नवीन विचारांतहि भलतीच रोगराई उपटते !

दादाला वाटे, आपल्या अगोदर वहिनींनीं मरावें !

कां ?

उगाच ! !

आणि हें माझ्या लक्षांत यायचें कारण म्हणजे माझ्या कानावर पडलेले कांहीं शब्द ! दादा एक दिवस वहिनींना म्हणत होता कीं, " ए–तुला जर पुढं त्रास होऊं नये अशी तुझी इच्छा असेल तर तूं मर आतां ! "

वहिनी म्हणाल्या, " म्हणजे काय ? "

" नाहीं, तसं कांहीं नाहीं; पण मला वाटतं तूं आतां मरावंस ! पाठीमागं राहणं चांगलं नाहीं ! " दादा म्हणाला.

आणि तरीही वहिनी हंसत हंसत म्हणाल्या, " मरणं माझ्या हातांत का आहे ? आणि तशी आपली खरोखरच इच्छा असेल तर खात्रीनं मी आपल्या अगोदरच मरेन ! "

या संभाषणानंतर बरेच महिने गेले. मध्यें दर आठपंधरा दिवसांनीं तरी दादा वहिनीला म्हणे कीं, " तूं मर आतां ! "

यावर वहिनी एक दिवस दादाला म्हणाल्या, " बरं मरतें तर मग ! आपणच सांगावं, मी केव्हां मरूं तें ! "

" तसं नव्हे ग, मला आपलं उगाचं वाटतं, कीं तूं माझ्या अगोदर मरावंस म्हणून. केव्हां काय ? केव्हां तरी माझ्या अगोदर मर म्हणजे झालं ! "

वहिनींनींहि तें कबूल केलें. जसें कांहीं मरणें म्हणजे तुळशीबागेंत जाऊन येणेंच आहे !

अशा तऱ्हेनें उदास विचारांचे वारे माझ्या घरांतून वाहूं लागले !

पण हीं सर्व वादळाचीं पूर्वचिन्हें ठरणार होतीं, हें कांहीं त्या वेळेला माझ्या लक्षांत आलें नाहीं !

एक दिवस आमचा दादा ऑफिसांतून घरीं आला. आणि आला तोच कुचमल्यासारखा आला. लगेच त्याला ताप भरला आणि तो ताप अखेर नवज्वराचा ठरला !

आज त्याच्या तापाला नववा दिवस होता.

डॉक्टरांनीं सांगितलें कीं, घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं, आणि म्हणूनच मी घाबरलों होतों ! कारण केस 'होपलेस' असली कीं, डॉक्टर छातीला हात लावून सांगतात, "घाबरण्याचें कांहींच कारण नाहीं." आणि अगदीं साधी केस असली, तर डॉक्टर सांगतात, "वेळेवर आलांत, म्हणून बरें झालें बुवा. आणखी दोन दिवसांनीं आलां असतां तर केस हातची जात होती !"

वेळ सकाळीं नऊ-साडेनवांची होती. मी दादाजवळ बसलों होतों; आणि वहिनी उभें लावून घेऊन अंग धुण्याच्या तयारींत होत्या.

आज आठ-नऊ दिवस, एक गोष्ट थोडीशी—विसंगत का सुसंगत, मला कांहींच सांगतां येत नाहीं— माझ्या लक्षांत आली होती. आमचा दादा इतका आजारी होता, तरी अगदीं शांतपणानें वहिनींचे देवधर्म चालत. तुळशीच्या प्रदक्षिणा वगैरे अगदीं शांततेनें होत ! आणि वहिनी माझ्याजवळ जे कांहीं दोनचार दिवसांपूर्वीं बोलल्या होत्या, त्याचा मला अर्थच कळत नव्हता ! आणि तें म्हणजे— "भाऊजी, चमत्कारिक वाटेल तुम्हांला माझं बोलणं, पण हे इतके आजारी आहेत, तरी माझ्या जिवाला कांहींच हुरहुर लागत नाहीं ! काय बरं याचं कारण असावं ? मनाला जास्तच उल्हास आणि आनन्द वाटतो आहे माझ्या ! कालच पाहा. तुम्ही फुलांचा पुडा आणलात ना ? त्यांत मोगऱ्याचीं सात-आठ फुलं

आलीं होतीं; त्यांतलीं पांचसहा फुलं मींच घेतलीं आणि—माझी मलाच लाज वाटते सांगायला—मुद्दाम सोपस्कारानं सुईदोरा घेऊन त्याचा गजरा करून मीं डोक्यांत घातला! स्वतःच्या जिवाचे शक्य तितके विलास करावेसे वाटतात मला अलीकडे! भातुकलीच्या खेळांत चट्टामट्टा करतांना जसं असेल नसेल तें आम्ही लहानपणीं खाऊन फस्त करीत होतों, त्याप्रमाणं मला झालं आहे!"

मातुकली आणि चट्टामट्टा!

मी मनांत म्हणालों, 'कुणाच्या आयुष्याच्या भातुकलीचा खेळ संपणार आहे–वहिनींच्या कीं दादाच्या—का दोघांच्याही!'

—दादाला वात झाला आणि त्यांत तो बडबडूं लागला! वहिनींनीं अंगावर पाण्याचा पहिलाच तांब्या ओतून घेतला होता. त्या तशाच दादाच्या अंथरुणाजवळ आल्या. मी बाजूला झालों! दादानें वहिनीकडे पाहिलें आणि तो वातांतच बरळूं लागला–
"ही आली आमची पतिव्रता! हिला मी आज पांच-सहा महिने सांगत आहे कीं, तूं माझ्या अगोदर मर म्हणून. पण–पण–पण—" आणि दादा चुटक्या वाजवूं लागला. आम्ही त्याला आवरीत होतों, तर कथेकऱ्यासारखे हावभाव करीत दादा म्हणूं लागला—

"पावना रामा! । पतितपावना रामा! ॥ जरि तूं पतितपावन नससी! तरी मग जातों माघारा!" आणि हेंच तो घोळूं लागला!

वहिनी दादाला धरून बसल्या होत्या! मध्येंच दादानें वहिनी-कडे वळून पाहिलें आणि म्हणाला, "हें काय– अंग ओलं तुझं– शेवटीं माझं नाहीं ऐकलंस ना तूं? ..., ... तुझ्या बऱ्याकरतांच तुला सांगत होतों– पण बघ माझं तूं न ऐकल्यामुळं मी तुझ्या आधीं मरणार आणि आमची पतिव्रता मागं राहणार! बोल– आहेस का नाहींस तूं पतिव्रता?– असलीस तर, चल ठेव माझ्या पायावर हात. म्हणजे मी जगेन यातून!" वहिनीनें नाटकी

थाटानें दादाच्या पायावर हात ठेवले. नंतर चार-पांच मिनिटांत दादाची बडबड कमी कमी होऊं लागली आणि त्याला गुंगी आल्यासारखें झालें ! त्याला स्वस्थ झोंप लागली.

वहिनी तिथून उठल्या. त्यांनीं अंग धुतलें. स्वतःचें देवदेवतार्चन आटपलें. तोंपर्यंत माझ्या बायकोनें स्वयंपाक केलाच होता आणि आश्चर्य ! वहिनी आज माझ्या बायकोला म्हणाल्या, "बाई, मी आज अगोदर बसतें जेवायला आणि आज तुम्ही वाढा आम्हांला. मला आज जरा कंटाळा आला आहे !" आणि नंतर माझ्याकडे वळून म्हणाल्या, "भाउजी, आज मी तुमच्या बायकोला त्रास देणार आहे ! चला, तुम्ही-आम्ही आज जेवायला बरोबर बसूं !" मीं आनंदानें हो म्हटलें. आणि आम्ही दोघें जेवायला बसलों ! बायको वाढीत होती !

वहिनी म्हणाल्या, "आज स्वैपाक खमंग झालाय्, नाहीं ! आतांशी जाऊबाई छानच स्वैपाक करतातहो ! बाई, मला कढी घाला हो थोडी !"

जेवण झालें. वहिनींनीं स्वतः आपल्या हातानें विडा करून खाल्ला आणि माझ्या बायकोला म्हणाल्या, "जाउबाई, आज मी अगदीं कामाला हात लावणार नाहीं. मी आतां पडतें जरा !"

माझ्या बायकोनें आनंदानें होकार दिला. एवढेंच नव्हे, तर वहिनीला निजण्याकरितां तिनें सतरंजी अंथरून दिली !

त्या वेळेला वहिनी माझ्याकडे पाहात म्हणाल्या, "भाउजी, अलीकडे एका माणसानें फार मनमिळाऊपणा धरला आहे—आतां तुम्हीहि त्यांच्याच कलानें वागत जा !" आणि वहिनी जाऊन निजल्या त्या दुपारीं चार वाजतां उठल्या !

उठून आल्याबरोबर त्या दादाजवळ गेल्या. दादा घामानें ओलाचिंब झाला होता !

वहिनी समाधानानें हंसल्या.

क्रमाक्रमानें दादाच्या तब्बेतींत सुधारणा होत चालली. तो घरांतल्या घरांत हिंडूं लागला.

× × ×

आज त्यानें आंघोळ केली आणि तो घराबाहेर पडला. आणि अंमळसा फिरून आला. मीहि दादाबरोबरच बाहेर गेलों होतों ! आम्हीं बाहेरून घरांत पाऊल टाकलें तों अंथरूण घातलेलें ! मीं विचारलें, " अंथरूण कुणाचें ? "

" बाईना ताप आला आहे–म्हणून त्या निजल्या आहेत ! " माझ्या बायकोनें सांगितलें !

मीं जाऊन पाहिलें, तों वहिनींच्या अंगांत बेसुमार ताप भरलेला होता ! तसाच कपडे न काढतां मीं डॉक्टरकडे गेलों. डॉक्टरना वहिनींची तब्बेत दाखविली. वहिनींनाहि नवज्वराचाच ताप भरलेला होता !

दिवसांमागून दिवस जाऊं लागले, तसतशा वहिनी खंगत चालल्या होत्या ! आणि ज्या मानानें त्या खंगत चालल्या होत्या, त्या मानानें त्यांच्या आवाजांत जास्तच कणखरपणा येत चालला होता !

मी म्हटलें, " ताप काय म्हणतो ? "

वहिनी:—ताप काय म्हणायच ? हे ? निघेल एकदोन दिवसांनीं !

मी:—वहिनी, काय ग तुझी अवस्था झाली आहे ही !

वहिनी:—चालायचंच ! कधीं ताप यायचा, कधीं बरं वाटायचं !

मी:—तें तत्त्वज्ञान पुरें झालं ! औषध घ्यायची वेळ झालीय् ना तुझी ?

वहिनी:—भाउजी, आपल्या राणीसरकारांनीं दिलं मला मघांशींच औषध. हल्लीं त्या माझी सेवाशुश्रूषा—पाठच्या बहिणीसारखी—नव्हे आईसारखी करतात ! तीन वाजतां औषध घ्यायचं असलं, तर तीन वाजून पांच मिनिटं कांहीं होऊं देत नाहींत ! भाउजी, माझ्या मनांत तुम्हांला एकदोन गोष्टी सांगायच्या आहेत—त्याप्रमाणं तुम्ही वागलांत तर--आयुष्य सुखांत काढाल !

मी:—हं, वहिनी, आतां बोलूं नकोस. डॉक्टरनीं सांगितलं आहे—फार बोलूं देऊं नका म्हणून !

वहिनी—पण आठवलं आहे तें सांगून टाकतें ! पुन्हा सांगायची वेळ येईल म्हणून तरी काय सांगावं ! भाउजी, खरं सांगूं का, या आजारांतून मी उठेनसं मला वाटत नाहीं !

मी:—शी: ! भलतंच काय बोलतेस !

वहिनी:—बरं, तें जाऊं द्या ! भाउजी, तुम्ही अंत:करणाचे वाजवीपेक्षां सरळ आहांत ! इतका सरळपणा जगांत चालत नाहीं ! तुम्ही क्षुल्लक गोष्टीवरून बायकोशीं तेढ धरतां--बरं नाहीं हो हें ! अहो--बायका चुकायच्याच ! त्या वयानं तुमच्यापेक्षां लहान असतात ना ? अगदीं प्रेमाची बायको झाली, तरी तिच्याजवळ आपलं अंत:करण खुलं करूं नये ! आणि अलीकडे मी पाहातें--एकदां मुलांचीं लग्नं झालीं, कीं त्यांना बायकोच्या माहेरच्या माणसांचाच जास्त ओढा लागतो ! याचं कारण सांगूं का,--तीं माणसं नवीन नात्यामुळं गोडगोड आणि आनंदानं बोलतात--आणि मनुष्य किती स्तुतिप्रिय आहे हें मीं तुम्हाला सांगायला नको--आणि बायकोच्या माहेरचीं माणसं--म्हणजे सुद्धां कांहीं तुमचीं दुष्मन नव्हत हो पण—तुमचीं स्वत:चींहि माणसं तुमचीं शत्रु नव्हत, एवढं लक्षांत ठेवून चालावं--तुमच्याबद्दल नाहीं हं हें मी सांगत--तुमच्याबद्दल जर मी कुरकुर करीन,--तर देव माझे हालहाल करील--माझ्या पाठच्या

भावासारखे, नाहीं--पोटच्या मुलासारखे वागलांत तुम्ही माझ्याशीं. तुम्हांला एवढंच सांगायचं, कीं परक्या कुळांतली मुलगी तुमच्या कुळांत आली आहे--तिला आपल्या कुळाचा अभिमान उत्पन्न होईल अशा आदरानं तिच्याशीं वागा आणि तिला वागवा —

मीः—वहिनी, मग बोल केव्हां तरी हें--खरंच वहिनी, मघाशीं पाहा येतांना ठेच लागली मला !—

वहिनीः—मग काय घातलंत त्याच्यावर ?—

मीः—कांहीं नाहीं घातलं अजून !

वहिनीः—जा तर मग-- बाईकडून हळकुंड-बिब्बा घाला त्याच्यावर !

मीः—पण तूं ती ठेच पाहाना अगोदर—

वहिनीः—मला किनई भाउजी; कुशीवर वळायला त्रास होतोय् !—

मीः—पण तूं एकदां हात लावून पाहा म्हणजे मला बरं वाटेल !—

वहिनीः—अगदीं काय लहान पोरासारखं करतां, भाउजी !

× × ×

आज वहिनींच्या तापाला नववा दिवस !

वहिनी अगदीं मलूल पडल्या होत्या. दादा पायथ्याशीं बसून होता. मी उशाशीं बसलों होतों आणि माझी बायको तिची सेवा-शुश्रूषा करीत होती !

वहिनीः—भाउजी, तुमच्या बाळाला आणा ना इकडे जरा ! मला त्याला पाहूं द्या तरी एकदां शेवटचा !

मीः—वहिनी, असलं अभद्र बोलूं नकोस ! शेवटचं शेवटचं असं कां म्हणतेस–तुझं काय वय झालंय् वाटतं ?—

वहिनीः—तुम्ही किनई, अगदीं पोरकट आणि फाजील आशा-वादी आहांत ! ( खिन्नपणानें हंसून ) आतां याच्यांतून का मी उठणार आहे ! आणा ना बाळाला एकदां इकडे !

दादा कांहींच बोलत नव्हता–तो मुकाट्यानें अश्रुसिंचन करीत होता.

मीं बाळाला आणलें; पण तो आतांशा वहिनींच्याकडे याय-लाच भीत असे. मीं अळेंबळें त्याला वहिनींच्या जवळ ठेवला–तों तो पळूं लागला !

" बघा भाउजी, पोरगं किती शहाणं आहे–त्यानं माझ्यावरची माया आतांपासूनच तोडलीन्–भाउजी, मला घाम येतोसा वाटतो आहे—"

आणि खडकांत जिवंत झरा लागावा; त्याप्रमाणें वहिनींना एक सारखा घाम सुटूं लागला. माझ्या छातीचे ठोके–धाड्धाड् करून पडूं लागले–मी वहिनींच्या अंगाचा घाम पुशीत होतों–कांहीं वेळानें वहिनीनें मलूलपणानें विचारलें, " माझ्या कपाळींचं कुंकूं आहे ना ? "

मीः—खरंच, पुसलं वाटतं ! थांब हं, लावतों मी तुला !

पण हें माझें भाषण पुरें व्हायच्या आंत दादा उठला आणि त्यानेंच वहिनींच्या कपाळीं भळवटवजा कुंकूं लावलं ! मला हुंदके येऊं लागले. वहिनी आतां शब्द तोडीत तोडीत बोलूं लागल्या, " इश्श–असं रडूं नये आजाऱ्याजवळ—आजाऱ्याला जास्त त्रास नाहीं का होणार अशानं ? भाउजी—मी चांगली हळदीकुंकवाची ओटी घेऊन चाललें आहे–" वहिनींनीं मधेंच दादाकडे पाहिलें आणि म्हणाल्या, " बोलाफुलाला गांठ पडून का होईना; पण बाई–इकडच्या मनासारखं होतं आहे ! "

वहिनींचा शब्द ऐकूं येईनासा झाला–आणि दादाचे हुंदके ऐकूं येऊं लागले !

वेळ संध्याकाळची होती.

घरांत दिवे लावणाच्या अगोदर माझ्या बायकोनें देवासमोर निरांजन लावलें !

देवासमोर निरांजन लावलें गेलें आणि वहिनींच्या देहांतील निरांजनाची वात निमाली !

आचके नाहींत, उचके नाहींत, विव्हळणें नाहीं–जसा पदरानें वारा घालून दिवा मालवावा, त्याप्रमाणें मान इकडची तिकडे झाली—आणि प्राणज्योत विझाली !

दादांनीं निर्लज्जपणानें वहिनींचें माझ्या देखत चुंबन घेतलें !

आणि मी—कापसाची म्हातारी हातांतून निसटून उडाली, म्हणजे लहान मुलें जशीं इकडे तिकडे धावतात, त्याप्रमाणें वहिनींच्या जिवाची म्हातारी इकडे तिकडे कुठें दिसते आहे का, हें बावचळल्यासारखें पाहात होतों !

माझ्या मनांतले सर्व विचार संपले ! वहिनींच्या चारित्र्याचा शुभ्रपट माझ्या डोळ्यांसमोर होता, आणि मी मनांत पुटपटत होतों--

"प्रकाश गेला । तिमिर हरपला । काय म्हणावें या स्थितीला ।
झपूर्झा, गडे झपूर्झा ! !"

× × ×

वाचकांनो, माफ करा--आतांपर्यंत कशीबशी गोष्ट लिहिली, आतां माझी लेखणी अनावर झाली आहे ! आतां जशी गोष्ट संपेल तशी संपेल ! आणि गोष्ट संपायची तरी काय राहिली आहे ?

पण 'प्राण गेला' म्हणजे मनुष्य संपला, हें जरी खरें असलें,

तरी त्याची प्रेतयात्रा करावी लागतेच ना ? तसेंच, गोष्ट आतां संपली--आतां ही--कथानकाची प्रेतयात्राच नव्हे तर काय ?

वहिनींची प्रेतयात्रा रीतसर पार पडली ! ज्या वहिनींवर आजपर्यंत आईसारखें प्रेम केलें तिला आम्ही जाळून आलों !

मला वाटलें, देवानें माझ्यावर दुबार सूड उगवला ! पहिल्या प्रथम लहानपणीं आई मारली हें एक—पण तो सूड त्या वेळेला देवाला पुरा वाटला नाहीं. कारण आईची हानि मला पुढें जाणवली. पण आईबद्दल रडावयाचें माझें शिल्लक राहिलेंच होतें. तें वसूल करण्याकरितांच मला वाटतें, वहिनींनीं मला आईसारखी माया लावली, आणि आपण मरून गेल्या ! आणि मी पण आईकरितां रडावयाचें राहिलें होतें तें वहिनींकरितां म्हणून रडून घेतलें !

आमच्या घरांत सर्वत्र औदासिन्याचें वातावरण पसरलें ! बागेंतील निम्मी अधिक फुलझाडें तोडलीं जावीं, म्हणजे राहिलेल्या फुलझाडांची शोभा जशी अधिक भयाण दिसतें, त्याप्रमाणें आमच्या घराचें झालें होतें !

वहिनींना आजचा तिसरा दिवस—वहिनींची राख सावडण्या-करितां आज आम्ही बाहेर पडलों !

जिवंत माणसाच्या अंगावरून जसा प्रेमानें हात फिरवावा, त्याप्रमाणें दादा वहिनींच्या राखेच्या देहावरून हात फिरवूं लागला, तसतसें एकेक हाड त्याच्या हातीं लागूं लागलें ! दादानें एकएक हाड हातीं घ्यावें, त्याजकडे निरखून पाहावें—आणि फडक्यांत टाकावें असें चाललें होतें !

अखेर वहिनींच्या हाताचीं हाडें दादाच्या हातीं लागलीं ! दोन्ही मनगटांच्या हाडांची फुली केल्याप्रमाणें जुडी होती, आणि त्या हाडांच्या गळ्यांत वहिनींच्या कांचेच्या बांगड्या जशाच्या तशाच होत्या !

दादा बेभानपणानें ओरडला, “अरे भाऊ ऽ ! हा पाहिलास चमत्कार ! पतिव्रता स्त्रियांच्या बांगड्या आगींत जळत नाहींत !” दादाला त्या बांगड्या कुठें ठेवूं आणि कुठें न ठेवूं असें झालें होतें !

*		*		*

आमचा दादा जवळ जवळ भ्रमिष्टच झाला होता ; पण तो स्वभावाचा पूर्वीपासून सज्जन, म्हणून ऑफिसमधल्या लोकांनीं त्याची नोकरी टिकविली होती.

दादा म्हणाला, “ भाऊ, या जागेंत आतां माझें लक्ष लागत नाहीं; आपण बिऱ्हाड बदलूं या ! ”

मीं रुकार दिला. आम्हीं दुसरी जागा पाहिली; पण जागा सोडून जातांना माझ्या मनाला काय वाटलें कुणास ठाउक, मीं फक्त वहिनींची खोली झाडून सारवून घेतली, आणि तेवढ्याच खोलीला रंग-सफेती करून ठेवली !

पण दादानें त्यावर विचित्रच प्रकार केला ! वहिनींच्या खोलीचें शेवटचें दर्शन घेण्याकरितां जों मी गेलों, तों खोलीच्या भिंतीवर कावेनें लिहिलेला खालील मजकूर दादाच्या हस्ताक्षरांत मला दिसला !

**नवीन बिऱ्हाडकरूंस धोक्याची सूचना !**

**या जागेंतील देवाचें वास्तव्य संपलें ! आतां येथें भूतें राहणार आहेत—म्हणून ही जागा कोणी वापरूं नये; वापरल्यास त्रास होईल ! आमचें कांहीं जात नाहीं !**

आम्ही नवीन बिऱ्हाडांत राहायला आलों. मी कौतुकानें आमच्या वहिनींच्या बांगड्या आदरानें ज्याला त्याला दाखवूं लागलों. त्यावर कांहीं म्हणूं लागले, “अहो, काय हा भोळेपणा–

त्या जागेवर आंच नीट लागली नसेल; म्हणून बांगड्या तशाच राहिल्या—यांत तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणं—"

पण यावर मी गहिंवरून म्हणालों, "चिकित्सकांनो, शंके-खोरांनो, मार्मिकांनो,–तार्किकांनो–माफ करा ! आपल्या ज्ञानाचा उपयोग करून घेण्याची मला इच्छा नाहीं ! खरें कांहींहि असो; मला याच गोड भ्रमांत राहूं द्या ! वहिनी–वहिनी–वहिनी--आणि वहिनींच्या बांगड्या—" आणि पुढें माझ्याच्यानें बोलवतच नसे. त्या वेळेला– बाजारांत एक पितळेची पांच आण्यांची खड्याची आंगठी मिळते; त्या खड्यांतून पाहिलें असतां देवतांचीं चित्रें दिसतात--त्याप्रमाणें मी त्या बांगड्या उजेडांत धरून पाही--आणि खरोखरच मला माझ्या वहिनींचें प्रतिबिंब त्यांत दिसे !

यांत कुणाला अतिशयोक्ति--किंवा बुद्धीचा भ्रामकपणा वाटेल पण अशांना मी असें छातीठोकपणानें सांगतों कीं, माझ्याइतकें निर्व्याज प्रेम तुम्ही कुणावरही करा, –आणि मग असे दैवी आभास मनाला होतात कीं नाहीं तें पाहा !



# एक नंबरचा अहाणा!

तो समोरचा फोटो पाहातच बसला. त्याच्या चेहऱ्यावर तो फोटो पाहून हर्षविषाद कांहींच उमटत नव्हते. जणूं दगडाचा पुतळा बनला होता तो.

असें त्या फोटोंत काय होतें?

त्या फोटोंत त्याचा मनोभंग होता.

संसारांत जी आपली भागीदारीण व्हावी असें त्यानें ठरविलें होतें—पण जिच्या वडिलांना तें पसंत नव्हतें—अशा तिचा फोटो होता तो! अत्यंत आदरानें तिनें त्याला दिला होता तो!

पण हाय! तिला तो फोटो देतां आला—पण त्याच्या संसाराला साथ करतां येत नव्हती तिला. हें सुद्धां तिनेंच त्याला कळविलें होतें.

त्याच्या मनाला अत्यंत विषाद वाटला. व्यवहारी जगाचा, समाजाचा, रूढीचा—हिंदुधर्माचा— पगडीचा—अंगरख्याचा संताप आला त्याला! अंगास राख फासून बैरागी होण्याचें ठरविलें त्यानें!

इकडे तिनेंहि त्रागा केला. अन्नपाणी वर्ज्य केलें. घरांत धुसफूस चालू ठेवलीन् तिनें! तिचा बाप निर्दयच! त्यानें तें मनावर घेतलें

नाहीं. आपला हट्ट सोडला नाहीं. तिच्या लग्नाबद्दल बोलणेंच सोडून दिलें त्यानें !



" अरेरे दुर्दैवा ! हेच ते शर्ट— माझें डोकें दुखत असल्यामुळें तिनें धुऊन ठेवले होते. आतां असा योग कधीं येणार ?" प्रियेच्या आठवणीकरितां त्यानें तेच शर्ट नेहमीं वापरण्याचें ठरविलें. 'प्रियेच्या हातानें धुतलेले' कायम ठेवण्याकरितां त्यानें ते पुढें अजिबात धुतलेच नाहींत ! चार महिने गेले असेच ! पुढें उन्हाळा आला—कपडे घामानें भिजूं लागले. तरीहि ते शर्ट धुतलेच नाहींत त्यानें ! अखेर उवा पडल्या त्यांत; परंतु त्यानें आपली तपस्या सोडली नाहीं !

तो तिच्या घरावरून नेहमीं हिंडत असे. त्यांतच त्याचें समाधान होतें. पुष्कळ वेळां त्यांची नजरानजर होई; पण बोलायचा धीर होत नव्हता त्यांना. डोळ्यांतून पाणी झिरपे त्यांच्या. तिच्या दारासमोर असें पाणी रोज साचूं लागलें. त्यांतच पावसाचें पाणी पडलें. तलाव झाला त्याचा ! पुढें म्युनिसिपालिटीनें रस्ते बदलून त्या तलावाचा हौद केला. अर्थात् तो सार्वजनिक ठरला !

पुढें तो नित्यनेमानें त्या हौदांत आंघोळ करायला येई. वर ती उभीच असे. तिच्या डोळ्यांतून उष्ण अश्रू पाझरत. ते त्याच्या नेमके अंगावर पडत. त्यामुळें खालून गार पाण्याची व वरून ऊन पाण्याची आंघोळ होई त्याला !

चार-पांच दिवसांतच तो आजारी पडला.

तिच्या वडिलांनीं एक दिवस त्याला बोलावून घेतलें आणि सांगितलें, " माझ्या मुलीशीं आपल्याला लग्न कर्तव्य असेल तर माझ्या दोन अटी आहेत ! "

अटीतटीच्या सामन्याला अटीतटीनेंच उभें राहावें त्याप्रमाणें तो ताडकन उठला. आपल्या केसांवरून हात फिरविला त्यानें ! कुत्र्याचें पिल्लू लडिवाळपणानें हातावर घ्यावें त्याप्रमाणें त्यानें आपली टोपी हातावर घेतली. फार नाजूकपणानें खोकला तो. आणि बोलूं लागला, " बाबासाहेब, अटींची बिशाद काय. दोन सोडून दोनशें सांगा—"

तिचे वडील म्हणाले, " साभिनय बोलण्याचें कांहींच कारण नाहीं. मी कांहीं टाळ्या वाजविणार नाहीं. तुम्ही कितीही चांगले बोललांत, तरी माझ्या अटी दोनः—

नं. १–रोज सदाशिव पेठेच्या हौदावर जाऊन सतत दोन महिने गार पाण्यानें आंघोळ करायची किंवा बरोबर सकाळीं पांच वाजतां उठून मला सतत तीन महिने हांक मारायची !

नं. २–फक्त एकच दिवस सकाळीं उठून पळत पळत पर्वतीला जायचें तशाच पायऱ्या चढायच्या तशाच उतारायच्या आणि घरीं जिवंत परत यायचें !

अटी ऐकतांच त्याचा चेहरा खर्रकन उतरला ! काय करावें त्यानें ? तो म्हणाला, " बाबासाहेब, यापेक्षां स्पष्ट नकार द्याना ! मला एक सिंगल चहा आणि सिंगल स्लाइस येवढ्या खुराकावर सहा महिने राहायला सांगा—राहून दाखवतो ! भरउन्हाळ्यांत एक गंजीफ्रॉक, तीन शर्ट्स, दोन स्वेटर्स, एक साधा कोट, एक डबल ब्रेस्टचा कोट असे एकदम घालून सबंध उन्हाळा काढायला सांगा तसं करतो—"

तिचे वडील म्हणाले, " म्हणजे आमच्या घरांत पुनर्विवाहाची सुधारणा घडवून आणण्याचा आपला विचार दिसतो आहे—"

विशिष्ट तऱ्हेनें मान वेडीवांकडी करीत तो उद्गारला,

" तें कसं काय ? "

" अहो, आपल्याला जर मी आपली मुलगी दिली तर पुनर्विवाहाचा प्रश्न येणार कीं दोन चार वर्षांत ! "

× × ×

नंतर एक वर्षांनीं.

तो काहूरच्या कटांत सामील झाला. संन्याशाचा वेष घेतला होता त्यानें. तरी आंत उवा पडलेला सदरा होताच !

एक दिवस कटाच्या गुप्त जागेंत तो एकटाच होता.

समोर तिचा फोटो धरला होता त्यानें. तोंच कटाचा नायक आंत आला, " काय हो कुणाचा फोटो ? कर्नलचाच ना ? अगोदरपासून ओळख पटवून ठेवतां होय. ब्रेव्हो ! "

पण हाय ! त्यानें तो फोटो पाहिला. स्त्रीचा फोटो पाहून कटवाला नायक विलक्षण चिडला. बुटाची ठोकर मारलीन् त्यानें त्याला. " यू डीजनरेटेड डॉग— गेट अवे ! स्त्रीनें मनोभंग केल्यानंतर आईची—देशमातेची आठवण ! नादान कुत्र्या चल चालता हो ! "

गुप्त 'बातमीदारानें बुटाची लाथ' या हेडिंगाखालीं ती हकीगत 'भविष्य'काळांत प्रसिद्ध केली !

× × ×

त्या हकीगतींत नांव नसतांनाच तिनें ओळखलें कीं, 'तोच तो ! '

नंतर तीन वर्षें गेलीं. दोघेंहि अद्याप अविवाहित होतीं.

अचल चित्तानें राहिलीं होतीं दोघेंहि. फक्त गांवांत लग्नसराईचे बेंडबाजे वाजूं लागले, कीं त्यांच्या अंतःकरणांत घुमाकूळ माजे; पण—पण—

कल्पना नसतांना एक दिवस तिचें लग्न झालें !

इकडे याची आई म्हणे, " बाळ, माझ्या देखत लग्न घे करून. माझे आतां केव्हां डोळे मिटतील—"

" शक्य नाहीं " तो म्हणे. आईनें प्राण सोडला !

त्याचे वडील म्हणत, " बाळ—"

" बाबा, मला आग्रह करूं नका. मी पळून जाईन अशानें !

बाप मरून गेला त्याचा !

त्याला लग्नाबद्दल आग्रह करकरून—सर्व आप्तेष्ट मेले त्याचे. पण त्याचा निश्चय अढळ राहिला !

× × ×

त्याची व माझी फार ओळख. अलीकडे तो नित्यनेमानें माझ्याकडे यायला लागला.

एक दिवस तो मला म्हणाला, " माझ्या प्रणयभंगावर गोष्ट लिहीना—"

मी—" पण गोष्टीचा शेवट कसा करूं ? "

तो—" तो आजन्म अविवाहित राहिला म्हणून ! "

" शक्य नाहीं. अशी गोष्ट मी लिहीन; पण तूं मेल्यानंतर ! काय नेम सांगावा. कदाचित् तूं उद्यांहि लग्न करशील ! मी

उतावळा लेखक नाहीं. आणि तुमच्यासारख्या भावनाप्रधान लोकांवर माझा विश्वास नाहीं; पहिल्यांदा कांहीं दिवस तुम्ही वेड पांघराल—तिच्या फोटोचेंच वेड घ्याल—ती ज्या रस्त्यानें गेली असेल त्या रस्त्यावरच पोस्टाच्या पेटीसारखे उभे राहाल. एकाद्या खुर्चीचीच आठवण धराल— ऑल हम्बग !" मी म्हटलें. तो गेला.

× × ×

नंतर तीन दिवसांनीं ?—

एका बागेंत.

ती.

तो.

आणि आडोशाला मी उभा होतों.

ती—"आतां पुरे झाला नाहीं का हट्ट— या जन्मीं नाहीं तुमचा-माझा योगायोग ! आतां आपणहि लग्न करून घ्यावंच गडे !"

"प्राणप्रिये—"

"आतां नाहीं हं हें चालायचं !"

"कां—"

"बेशरम* नाहीं तर— कां म्हणून विचारतां—?"

* सदर गोष्ट जगप्रसिद्ध लघुकथालेखक 'मॉरिस शुगर केन'च्या "One Number–Cha Fool" या रोमहर्षकारक गोष्टीचा अनुवाद असल्यामुळें मला त्यांत फरक करतां येत नाहीं. ही गोष्ट जर माझी असती, तर मी तिला म्हणायला सांगितलें असतें—

"अहो, त्यांत काय आहे—? प्रेमाला बंधनें नाहींत—मला जरी तुमच्याशीं लग्न करतां आलें नाहीं—माझें लग्न झालेलें असलें, तरी आपल्याला प्रेम करायला काय हरकत आहे ? जय कटु सत्य !"

" मग काय लग्न करूं म्हणतेस—तुझी आज्ञा ? "

" आज्ञा असं नाहीं—पण लग्न केलेलं बरं ! "

" पण असं मिळमिळीत कां—मला आज्ञा कर. तुझ्या आज्ञे-बाहेर मी नाहीं ! "

" तर, तर मग आज्ञा करतें—"

× × ×

त्याच्या कपाळीं मुंडावळ्या बांधल्या गेल्या. लग्न झालें एकदांचें त्याचें !

असा प्रेमाचा प्रभाव आहे. आईला—वडिलांना—आप्तेष्टांना न जुमानणारा तो प्रियेच्या एका शब्दानं लग्न करता झाला ! आणि म्हणे प्रेमांत सामर्थ्य नाहीं !

—त्या दिवसापासून त्या गांवांत तो एक नंबरचा शहाणा म्हणून ओळखला जाऊं लागला ! त्या गांवांत लहानांपासून वृद्धां-पर्यंत, कुत्र्यापासून मांजरापर्यंत कोणालाहि विचारा, ते तुम्हांला एक नंबरचा शहाणा दाखवितील !



## सर्कस

एका खेडेगांवांत–खेडेगांवांत म्हणजे अगदींच खेडें नव्हे अशा खेडेगांवांत–एकदां एक सर्कस आली होती.

त्या गांवांत त्या सर्कशीचे खेळ चालू झाले. प्रेक्षक जाऊं-येऊं लागले. हजारों लोक आले आणि गेले, पण त्यांच्याशीं आपल्याला कांहींएक कर्तव्य नाहीं.

एके दिवशीं काय झालें? सर्कसचा दुपारचा खेळ होता. खेळाला गर्दी चिकार झाली होती. कांहीं कांहीं लोक तंबूबाहेर उभे राहून गर्दीच पाहात होते.

इतक्यांत—

सर्कसचा सिंह सुटला नाहीं! वाघ पळाला नाहीं–कसलाहि अपघात झाला नाहीं–तर एक सुंदर स्त्री–अशी सुंदर, कीं जिचें वर्णन सगळ्या कादंबऱ्या-गोष्टींतून एकसारखेंच असतें, अशी स्त्री एकटीच सर्कसला आली. गर्दीतून मार्ग काढून तिकिट काढूं लागली.

सर्व लोक तिच्याकडे पाहूं लागले. कारण सौंदर्यच तसें होतें.

तिनें तिकिट काढलें आणि ती आंत जाऊं लागली.

पण त्यामुळें बाहेर काय झालें?

ज्या तरुणाला अत्यंत जरूरीचें काम असल्यामुळें मनांत इच्छा असूनहि आज सर्कसला जायचें नाहीं असें ज्यानें ठरविलें होतें त्यानें पटकन आजच्या खेळाला जायचें ठरविलें. सर्कसला न जाण्याचा त्याचा निश्चय ढांसळला. त्यानें खिशांतून पैशांचें पाकीट काढलें,

त्यांतून नोट काढली, त्याचें तिकिट खरेदी केलें आणि तो आंत जाऊं लागला.

एवढें पाल्हाळानें कां लिहिलें माहीत आहे का? त्यांत त्या तरुणाची कर्तबगारी होती.

सध्यां जर स्वराज्य असतें तर तो एक मोठा नामांकित हेर झाला असता. आणि तो तरुण जर कल्पनेंतल्या भूतकाळांत असता तर 'चार आणे माले'चा डिटेक्टिव्ह रामराव झाला असता.

कारण त्या तरुणानें कसें हेरलॅन् कुणास ठाऊक? कसें जाणलें कुणास ठाऊक–काय हिशेबानें गणित केलें त्याचें त्यालाच माहीत! का तो सर्कसचा तिकिटविक्या त्याला सामील होता हरि जाणे! पण त्यानें तिकिट काढलें तें नेमकें–गर्दीतून तिकिट काढणाऱ्या सर्व लोकांना आपल्याकडे पाहयला लावणाऱ्या तरुणीच्याच शेजारच्या खुर्चीचें निघालें!

सर्कसचा खेळ चालू झाला.

तरुण-तरुणी योगायोगानें शेजारीं शेजारीं बसलीं होतीं. मीं गोष्टींत त्या तरुण-तरुणीला खेंचलें आहे तेव्हां तीं अविवाहित होतीं हें सांगायला पाहिजे का?

सर्कस कशी झाली सांगतां येत नाहीं; पण सर्कस तिकडे चालू असतां इकडे त्या तरुणीचा हातरुमाल खालीं पडला तो त्या तरुणानें मोठ्या रसिकतेनें उचलून त्या तरुणीला दिला. मध्यंतरीं उकडायला लागलें म्हणून त्या तरुणीनें आपल्या हातांतला पंखा तरुणाला वारा घेण्याकरितां दिला. तरुणानें वारा घेऊन पंखा परत करतांना आपलें व्हिजिटिंग कार्ड त्या पंख्याला टांचणीनें टोंचून दिलें!

तरुणीजवळ व्हिजिटिंग कार्ड नव्हतें; पण तिच्या हातांत एक

पुस्तक होतें, त्या पुस्तकावर तिचें नांव होतें तें तिनें त्या तरुणाला वाचायला दिलें.

मग राहिलेल्या वेळांत तीं दोघें एकमेकांकडे पाहात होतीं, हंसत होतीं, मुरकत होतीं.

सर्कस सुटली.

सांकेतिक नजरेनें एकमेकांना कसली तरी खूण करून तीं दोन हृदयेंहि मार्गाला लागलीं.

अशा तऱ्हेनें त्या गांवांतील बराचसा पैसा गोळा करून व त्यांतल्या त्यांत त्या दोन हृदयांना जखमी करून ती सर्कस त्या गांवाहून निघून गेली !

× × ×

ती सर्कस त्या गांवच्या नदी कांठच्या वाळवंटावर उतरली होती आणि आतां त्याच जागेवर तीं दोन जखमीं हृदयें हल्लीं सायंकाळीं फिरायला येत होतीं.

एके दिवशीं संध्याकाळीं एका विशिष्ट जागेकडे हातांतील काठीनें खुणवीत तो तरुण म्हणाला, " शरद्, मला वाटतें याच जागेवर सर्कशींतल्या आपल्या खुर्च्या आल्या होत्या नव्हे ! अरेरे, भाग्यशाली सर्कसचा तंबू ! सर्कशींत आपण प्रत्येकानें चार साडे-चार रुपयांचें तिकिट काढतांच एकमेकांशेजारीं बसूं शकलों ! पण शरद्, आपल्या घरच्या माणसांच्या परवानगीचें तिकिट काढून आपणांला नवरा-बायको या नात्यानें समाजाच्या सर्कशींत वावरता येईल का ? "

पॉयशाच्या फवाऱ्यांतून फिनेल ज्या तुषारानें बाहेर पडतें तितक्या जोराचा सुस्कारा टाकून व विजेचा पंखा ज्या जोरानें इकडून तिकडे फिरतो त्या जोरानें आपले हात समाजाच्या वस्ती-

करून फिरवीत शरद् म्हणाली, " आपण सध्यां या वाळवंटांत फिरतों आहोंत कुणाला ठाऊक काय आपल्या नशिबांत आहे तें. पण माझ्या हृदयाच्या कलिजा, अखेर या वाळवंटांत यावं लागलं तरी चालेल; पण पण–आपण माझे आणि मी––"

" लाडके शरद्, काय अभद्र कल्पना बोलतेस? माझ्या जिवाच्या नशिबा! एकदां सोक्षमोक्ष करूनच टाकूं या. तूं आपल्या घरीं विचार, मी आपल्या घरीं विचारतों—"

हळूहळू काळोख पडला त्यामुळें कांहीं दिसेनासें व ऐकूं येईनासें झालें!

× × ×

त्यांचें लग्न जमायला विशेषशी कांहींच अडचण नव्हती! पण तो तरुण होता कोंकणस्थ आणि ती तरुणी होती देशस्थ.

शहरांत याचें कांहींच वाटलें नसतें; पण तीं दोन हृदयें एका खेडेगांवांत राहात होतीं हें मीं अगोदरच सांगितलें आहे.

जर आईबापांनीं आपल्या लग्नाला रुकार दिला नाहीं तर त्यानें आत्महत्या करायची हें नक्की ठरवून, एका पाकिटांत त्यांनीं समाजाला संदेशहि लिहून ठेवला होता व वस्तऱ्यानें आत्महत्या करण्याचें त्यानें ठरविल्यामुळें तो दाढी सेफ्टी रेझरनें करीत असल्यामुळें एक पोलादी पात्याचा विलायती वस्तराहि त्यानें आणून ठेवला होता.

तिनेंहि लग्न होत नाहीं असें ठरतांच नदींत उडी टाकायचें ठरविलें होतें.

पण हाय. त्यांच्या मृत्यूला कारण निराळेंच व्हायचें होतें!

× × ×

नंतर आमच्या या गोष्टीच्या निकालाच्या दिवसाची गोष्ट. त्या वाळवंटावर—–

शरद्—
आणि तिच्या हृदयाचा कलिजा.
" हं मग काय शरद् विचारलंस कां तूं आपल्या वडिलांना ?"
" हो ! "
" मग काय म्हणाले ते ? आहे कां कांहीं जीविताची आशा ? "
" पण आपण विचारलंत का आपल्या वडिलांना ? "
" हो ! "
" मग आहे कां कांहीं जगण्याची आशा ? "
" पण अगोदर तुझ्याकडचा निकाल लागूं दे ! "
एक मुरका आणि " पण पहिल्यांदा आपण सांगावं गडे ! "
" बरं तुझी इच्छा ! "
" हं बोलावं गडे—मी आपल्या जिवाचा कान करून ऐकतें आहे—"
हे शब्द ऐकतांच तो तरुण केंविलवाण्या स्वरांत म्हणाला, " लाडके शरद्—नको ग इतक्यांत जिवाचं कांहीं करूंस ! ! ! "
" इश्श ! " ती तरुणी हंसत म्हणाली, " हें काय भलतंच ! मी कांहीं जिवाचं बरं वाईट-करीत नाहीं—लक्षपूर्वक ऐकण्याकरितां मी जिवाचा कान करतें आहे ! "
" अस्सं—अस्सं ! कांहीं उपमा आहे होय ? " त्या तरुणाला तें कळत का नव्हतें ? तो चांगला शिकलेला होता; पण प्रेमाच्या कल्पनेंत तो तुफान झाल्यामुळें शुद्धीवर नव्हता !
" हं—मग काय म्हणाले आपले वडील ? "
" त्यांनीं पुष्कळ आढेवेढे घेऊन लग्नाला संमति दिली अखेर !
दोघांचे दोन मोठाले सुस्कारे !
तिच्या डोळ्यांत दोन पुसटपुसट आनंदाश्रु !
" आतां लाडके, अर्धा निकाल लागला— तूं माझी अर्धांगी

झालीस. तुझ्या वडिलांचें म्हणणें सांग—हं हं. कचरूं नकोस. निकाल विरुद्ध असला तरी मीं वस्तरा तयार ठेवला आहे ! ”

वस्तऱ्याचें पातें लक्कन् चमकलें !

वाघ आपल्या सावजावर जशी झडप घालतो त्या चपळाईनें तिनें तें शस्त्र हस्तगत केलें व समोरच्या नदींत फेंकून दिलें !

तेव्हां तो उसळून त्या तरुणीचे हात आपल्या हातांत घेत श्वास लागल्यामुळें अडखळत म्हणाला, “ लाडके, हा मी शुभशकुनच समजूं का ? बोल—बोल, तुझ्या वडिलांनींहि संमति दिली होय ना ? शरद्—शरद्—झटकन होय म्हण—पटकन रुकाराची मान हालव नाहींतर माझं हार्ट फेल होईल ! ! ! ”

“ खरंच ? ”

“ खरंच ? ? ? ”

“ हं खरंच ! ! ! ! ”

दोघांच्याहि वडिलांची संमति त्यांच्या विवाहाला मिळाली होती. आतां वास्तविक त्यांचें लग्न व्हायचें.

पण हाय ! ! त्यांच्या नशिबांत लग्न नव्हतें; मृत्यु होता !

कसा ?—पुढें सांगितल्याप्रमाणें ! !

केव्हां ?—लगेच ! !

हाय ! हाय !!

मध्यें पांच-दहा मिनिटें गेलीं. तो तरुण हळूहळू गंभीर होऊं लागला, त्यानें आपल्या मुठी आवळल्या, त्याच्या अंगावर रोमांच ाले, डोक्यावरचे केस ताठ उभे राहिले—तो आपले डोळे गरगर रवूं लागला,

ती तरुणी प्रसंगाला साजेसाच अभिनय करीतच होती. नंतर तरुण एकदम किंचाळून ओरडला, “ हाय, हाय, दुर्दैवा— ेर शेवटीं तं दावा साधलासच ! ”

" नाऽऽऽऽथ. काय हो झालं?" ती विव्हळत म्हणाली.

" लाडके, काय सांगूं?? अरेरे! इतकं निष्काम प्रेम केलं—शेवटीं आत्मघाताची तयारी ठेवली; पण अखेर शेवटीं—

वाचक, थोडे थांबा. आतां चार वाक्यांतच गोष्ट संपते आहे!

" पण अखेर शेवटीं—आमच्या निस्सीम प्रेमाला कुणाचाच विरोध नाहीं!! बाबा, मी तुमच्या नांवानें ओरडलों असतों म्हणून कां तुम्ही संमति दिलीत!! प्रेमाला विरोध नाहीं. अशा प्रेमांत काय जीव आहे??" त्यानें ताडकन् शरदूला ढकलून दिलें. ती चार हातांवर जाऊन उभी राहिली!!

" शरद्—सुटला तुझा माझा संबंध! मी सिंह आहे! हा सिंह मेलेली शिकार खात नसतो!! बिनविरोधी प्रेम! काय त्यांत अर्थ आहे!! अरेरे! अखेर असलें प्रेम माझ्या वांट्याला यावें ना?"

तो तरुण बेशुद्ध पडला!

" अगबाई—" हनुवटीवर आश्चर्याचें बोट ठेवीत ती तरुणीहि किंचाळली. " आतां हा अनर्थ माझ्या लक्षांत आला. अगबाई, काय हो झालं हें?"

ती तरुणी त्या तरुणाजवळ गेली. तो बेशुद्ध पडलेला पाहून तिनें शोक केला; पण तिला वाटलें तो हार्ट फेल होऊन मेला असावा—तोच तिच्या हृदयाला धक्का बसला आणि—ती खरोखरच हार्ट फेल होऊन मेली!!

तास-दोन तासांनीं तो तरुण शुद्धीवर आला. पाहतो तों ती तरुणी मेलेली! त्याला आनंद झाला!! आहे, प्रेमांत कांहीं तरी रस निर्माण झाला. त्या तरुणानें तिला आपल्या दोन्ही हातांवर उचलून घेतलें व एक उत्कृष्ट शोक-गीत म्हणत म्हणत त्यानें शेजारच्याच नदींत तिच्यासह जलसमाधि घेतली!!!

---

# बर्नार्ड शॉ

प्रसिद्ध लेखक काका करमरकर यांचें नांव ज्यांना ठाऊक आहे त्यांना त्यांजविषयीं जास्त माहिती सांगण्याचें कांहींच कारण नाहीं. पण ज्यांना तें ठाऊक नाहीं त्यांना त्यांची समग्र हकीकत अगोदरच सांगायला हवी !

त्यांच्या आप्तेष्टांना—सग्यासोयऱ्यांना, त्यांच्या चाहत्यांना—त्यांच्या निंदकांना एकाच गोष्टीविषयीं मोठें कोडें पडलें होतें. आणि तें कोडें म्हणजे असहकारितेच्या १९२० च्या ऐन धामधुमींत डबल ब्रेस्टचा कोट, पर्शियन कॅप, जॉन पील धोतर, कडक कॉलर वगैरे वस्त्रालंकारमंडित राहणारे काका करमरकर—इसवी सन एकोणिसशें सत्ताविसांत कोणतीहि धामधुमीची चळवळ चालू नसतांना—त्यांचे वरील कपडे फाटलेले नसतांना—जरी फाटलेले असते तरी तसेच आणखी एक डझन कपडे करण्याइतके पैसे खिशांत खुळखुळत असतांना— त्यांचें लग्न अगोदर झालेलें असल्यामुळें—भावी प्रियेनें खादीचें पातळ नेसण्यास सुरुवात केली म्हणून तिच्या डोळ्यांत धूळ टाकण्याकरितां आपणहि खादी परिधान करावी अशी आवश्यकता नसतांना—

—आपलें सहज एके दिवशीं संध्याकाळीं काका करमरकरांनीं हें सर्व कपड्यांचें रंगरूट फेंकून द्यावें आणि खादी टोपी, दास शर्ट आणि राजापुरी पंचा लावावा याचा अन्वय-अर्थ काय ?

हेंच कोडें त्यांच्या आप्तेष्टांना—नातेवाइकांना—चाहत्यांना व निंदकांना पडलें होतें !

सर्वत्रांनीं खूप इतिहाससंशोधन केलें पण कार्यकारणभाव लागेना ! काका करमरकर थांगपत्ता लागूं देत ना आणि कोड्यांत पडलेल्या माणसांना चैन पडेना ! काय करावें ?

पुष्कळ चवकशीअंतीं एकच धागा हातीं लागला ! तो म्हणजे काका करमरकरांना घाम कधींच येत नसे. असें असतांना ज्या दिवशीं कपड्यांचा ट्रॅन्सफर सीन झाला त्याच्या अगोदर बरोबर एक मिनिट काका करमरकर घामानें नखशिखान्त निथळत होते ! घामानें निथळत ते बाहेर आले ! बाहेरचा गार वारा त्यांनीं खाल्ला आणि एका मिनिटांत शान्त होऊन खोलींत गेले व परत एक मिनिटानें ते बाहेर आले ते नखशिखान्त खादी पेहेरावांत !

आतां या धाग्यावरून कोड्याचा उलगडा करावयाचा म्हणजे त्यांना 'घाम' आणण्यासारखें काय झालें ? त्यांना घाम कां आला हें शोधलें पाहिजे ! नाहीं तर काका करमरकरांना घाम कधींच येत नसे हें मागें सांगितलें आहेच; पण आतां हें सांगतों कीं, काका करमरकर विषम—नवज्वर—साधा ताप—डांग्या खोकला वगैरे सर्व रोगांनीं पछाडले जात पण त्यांतून ते घाम आल्याशिवाय सहीसलामत उठत ! बोला, आतां काय म्हणतां ?

* * *

—अखेर घाम येण्याचा—कपडे अचानक पालटण्याचा सुगावा मजला अचानक लागला ! तो खालीं देत आहे; पण सुगावा कसा लागला हें मात्र सांगतां येत नाहीं याबद्दल दिलगीर आहे. कारण सुगावा देणाऱ्या माणसांचें आणि काका करमरकरांचें विनाकारण वांकडें यायचें ! आणि त्यापासून मला लभ्यांश काय ?

आपल्याला एक गमतीदार हकीकत ऐकायला मिळेल येवढा फायदा मला पुरे झाला. नांवनिशी काय करायची ? कादंबरींत

ओळखदेख झालेल्या पात्रांचा कोणी सत्यसृष्टींत तपास करतो काय ? आपलें ऐकायचें आणि सोडून द्यायचें !

पण मी सांगणार असलेल्या गोष्टींत खुबीदार कल्पकता आहे म्हणून ती गोष्ट मुद्दाम सांगणार आहे.

काका करमरकरांना ज्या दिवशीं घाम आला त्याच्या नऊ दिवस अगोदरची कथानकाची सुरुवात आहे ! काका करमरकरांना कल्पनेचा नवज्वरच झाला होता म्हणानात !

काका बोलून चालून लेखक—तेव्हां त्यांच्याकडे होय-नव्हे चार माणसें रोज यायचीं जायचीं ! कांहीं मासिकांचे संपादक—कांहीं प्रोफेसर्स—कांहीं सुशिक्षितगण, कांहीं नवशिके लेखक, होय-नव्हे हजार जातींचीं !

पण घाम येण्यापूर्वी नऊ दिवस अगोदर काय झालें— काका नळावर आंघोळ करीत होते तोंच त्यांच्याकडे एकदोन नवशिके लेखक आले. खोलींत गेले, बसले आणि जरा वेळानें परत गेले. पण जातांना आश्चर्यचकित होऊन गेले ! एखादी अद्भुत गोष्ट खोलींत असावी असें वाटण्याइतका त्यांच्या चेहऱ्यावर आश्चर्याचा भाव दृग्गोचर झाला !

" बराय्, काका येतों." आज त्या जाणाऱ्या माणसांनीं जरा जास्त लवून काकांना नमस्कार केला !

अरेच्या ! त्या आश्चर्य उपस्थित करणाऱ्या वस्तूंत—काकांना जास्त लावून नमस्कार करायला लावण्याची करामत आहे तर ?

काय आहे बुवा असें ?

वाचक, मी अशींच मधून मधून प्रश्नचिन्हें टाकणार; एरवीं तुमची उत्कंठा (?)* वाढणार कशी ?

*(?) ही खूण अर्थाकरितां अगर उपयोगाकरितां नाहीं. अलीकडे पुष्कळ लेखांतून कारण नसतांना पुण्य (?) शहाणे (?) समंजस (?) गाढव (?) अशा

पहिल्यांदा नवशिके लेखक आले—
—आश्चर्यचकित होऊनिऽगेले !
नंतर संपादक आले—
—बेमान होऊनि ऽ गेले ! !
नंतर अवान्तर खेही आले—
—तसेंच होऊनि ऽ गेले ! ! !

त्या आश्चर्यचकित करणाऱ्या गोष्टीचा बभ्रा आतां आजूबाजूला बराच झाला होता ! जो तो त्या गोष्टीबद्दल काकांची स्तुति करूं लागला ! कोणी म्हणे " त्यांची योग्यताच तशी आहे ! "

कोणी म्हणे, " गाजविलीन् बुवा या दक्षिणी गब्रूनं ! "

याप्रमाणें कोणी कांहीं–कोणी कांहीं– हरतऱ्हेनें लोक काका करमरकरांचें गुणसंकीर्तन करूं लागले पण—

पण—

पण—

पण—

आणि—हं, आठवलें बरें का !

काय कीं, जिथें आस्तिक आहेत तिथें नास्तिक असणारच !

एका नाठाळ इसमाला काका करमरकरांचा हेवा वाटूं लागला. तो म्हणे, " असं असणंच शक्य नाहीं ! "

लगेच त्याचा मित्र म्हणे, " अरे, नाहीं काय ? मीं प्रत्यक्ष या डोळ्यांनीं पाहिलं ! "

लगेच तो नाठाळ म्हणे, " तूं कांहींहि म्हण, तुझ्या डोळ्यां-वरसुद्धां माझा विश्वास नाहीं ! "

---

जिव्हाळ्याच्या शब्दांपुढें अशी खूण असते ! आणि मला अशी खूण वापरण्याचा अजून मोका साधलेला नाहीं सबब तो येथें साधून घेतला आहे. याबद्दल मी दिलगीर (?) आहे ! ! !

मग त्याचा मित्र म्हणे, " बरं बुवा ! संध्याकाळीं तूं प्रत्यक्ष पाहून ये पाहूं आज !"

ताड्कन् उठत तो नाठाळ म्हणाला, " तूं न सुचवितांच मी आज जाऊन पाहून येणार आहे ! मग सांगेन खरं कीं खोटं तें !"

मित्र म्हणाला, " आणि खरं ठरल्यास ? "

" खरं ठरल्यास मी काका करमरकरांना भररस्त्यांत, सांगशील तिथं, तूं सांगशील तितके साष्टांग नमस्कार घालीन–आणि खोटं ठरल्यास ?——"

तो मित्र म्हणाला, अगोदर तूं जाऊन पाहून तर ये ! "

" बरं, हा निघालोंच ! " नाठाळ गृहस्थ निघून गेला !

बिचाऱ्या काका करमरकरांच्या स्वप्नींहि नव्हतें कीं, आज आपल्याला सपाटून घाम येणार आहे ! शिव शिव ! काय योगायोग हा !

× × ×

" ओऽहो ! नमस्कार काका ! " तो नाठाळ काकांकडे आला होता.

" या, या. आज बरेच दिवसांनीं धूळ झाडलीत इकडे !" काका करमरकर विनयानें म्हणाले.

" कांहीं नाहीं, सहज आलों ! " टेबल धुंडाळीत तो नाठाळ म्हणाला. अखेर शेवटीं 'ती प्रत्येकाला आश्चर्यात लोटून देणारी' चमत्कारिक वस्तु त्याला दिसली. ती अगदीं टेबलाच्या कडेला होती. खुर्चीवर बसल्या बसल्याच त्या नाठाळानें टेबलावर आडवें पडून ती वस्तु हस्तगत केली !

आणि निरखून पाहतो तों काय—खरेंच !

" पण—अरेच्या ! जिंकली ! "

"काय हो काका— आपला लौकिक फार दूरवर पसरला बुवा! वा, कॉंग्रॅच्युलेशन्स्!! हार्टी कॉंग्रॅच्युलेशन्स्!!!"

"अहो, आहे काय त्यांत—परतभेट आहे नुसती ती!"

"कां होईना—पण त्याच्या पोटीं आदर आहे!" नंतर मिस्किलपणानें हंसत तो पुढें म्हणाला, "पण काका, आपण कल्पक खरेच हं—पण आपण जितकी कल्पकता लढविलीत त्या मानानं जर 'धोरण' आणि 'दूरदृष्टि' राखली असतीत किनई, मग मीसुद्धां फसलों असतों. पण काका, घसरलांत थोडेंसें आपण. कबूल करा अगर करूं नका, पण आपण फसलांत खास!" ती आश्चर्यचकित करणारी वस्तु काकांपुढें करीत तो नाठाळ म्हणाला, "काका, अहो, याच्यावरचं हें अक्षर तुमचंच आहे. हें जरा बारकाईनं पाहिलं कीं कोणीहि ओळखील. अजून कोणी बारकाईनं पाहिलं नाहीं म्हणून सर्व लोक फसले.—होय कीं नाहीं?"

काका किंचित् डळमळलेच! पण धिटाईनें पुढें म्हणाले, "तुम्हीं लोकांनीं फक्त संशयच घ्यायचा. अरे साहेबा, गेल्याच मेलनं आलं आहे तें—"

"हं काका, आतां मात्र सफाई सांपडलांत! या, असे इकडे या आणि पाहा. यावर शिक्का आहे 'एन्. तारपोरवाला' म्हणून! अहो परस्पर मेलनं आलेल्या जिनसेवर 'एन्. तारपोरवाल्या'चा शिक्का हो कशाला?"

काकांनीं तो शिक्का पाहिला आणि त्यांना मळमळायला लागल 'पाहूं पाहूं' म्हणून ती जिन्नस हातीं घेऊन काकांनीं पाहिली. लगेच त्यावरचीं एकदोन पानें फाडून काढलीं आणि त्याच्या चिंध्या करून त्यांनीं खिडकीवाटे खालीं फेंकून दिल्या!

खरी गोष्ट अशी घडली होती कीं, श्रीयुत राजमान्य राजश्री सकलगुणालंकरणमंडित काका करमरकरांनीं प्रसिद्ध नाटककार

'बर्नार्ड शॉ' यांचें नुकतेंच प्रसिद्ध झालेलें 'ॲपल कार्ट' हें नाटक 'एन्. तारपोरवाला' या कंपनीकडे मेलनें आल्याबरोबर पूर्ण किंमतीस विकत घेऊन त्यावर आपल्या डाव्या हातानें पण शाईनें—

इंग्रजींत

'श्री. रा. रा. काका करमरकर यांस

ग्रंथकर्त्याकडून सप्रेम भेट.'

असें लिहून आणि खालीं 'बर्नार्ड शॉ' अशी सही करून सदर पुस्तक सहज ठेवल्यासारखें त्यांनीं आपल्या टेबलावर ठेविलें होतें! आणि हेंच पाहून आणि खरें वाटून प्रत्येकजण आश्चर्यचकित होत होता—काकांना लवून नमस्कार करीत होता, काकांचे गोडवे गात होता !—

आणि आतां तें रहस्य या नाठाळानें फोडलें— आतां हा आपलें हें बिंग गांवभर सांगत सुटणार या कल्पनेनें काकांना पुस्तक टेबलावर ठेवल्यापासून बरोबर दहावे दिवशीं सपाटून घाम आला—आणि नंतर त्यांनीं विचार केला ! आतां आपल्याला असा घाम फार वेळां येणार आणि आपले कपडे सगळे घामट होणार, त्यापेक्षां Why not wear खादी ? आणि तेव्हांपासून काका आणि खादी यांची सांगड जमलेली आजतागायत आहे !

परमेश्वराची लीला ही अशी अगाध आहे ! तो दीनदयाळू परमेश्वर कुणाकडून काय रूपानें देशसेवा करून घेईल हें आपणां पामरांना कसें कळणार ?



# लेंकराची जिज्ञासा !

चौकशीअंतीं असें कळलें कीं, तो एक अत्यंत सरळ वृत्तीचा पण विक्षिप्त माणूस होता !

त्याच्या फाजील चिकित्सक वृत्तीमुळें त्याचें जितकें नुकसान झालें होतें व होत होतें तितकें जर तो सरळ धोपट मार्गानें वागला असता तर झालें नसतें ! कोणतीहि गोष्ट अतिरेकाला न्यायची हा त्याच्या मनाला एक महाभयंकर रोग जडला होता !

'व्हिटामिन्स'चें गौडबंगाल एक दिवस त्याला कळलें. तेव्हांपासून बाजरींत व्हिटामिन असतें का नाहीं—मेथीच्या भाजींत असतें का नाहीं, काकडींत जास्त प्रमाणांत असतें का कांद्यांत कमी असतें ह्याचे पंचनामे सुरू झाले ! एक दिवस त्याला कळलें कीं, सर्वांपेक्षां गाजरांत व्हिटामिन जास्त असतें. तेव्हांपासून जी घरांत गाजरें यायला सुरवात झाली तीं नवरा-बायकोचें एक दिवस कडाक्याचें भांडण होऊन 'व्हिटामिन्सच्या अभावीं मी मेलें तरी चालेल, पण गाजरं बंद करा; नाहीं तर मी जीव देतें' इतक्या थरावर जेव्हां गोष्ट आली तेव्हां घरांतला गाजरांचा रतीब बंद झाला !

अहो, अतिरेक म्हणजे किती ? गृहस्थ जेवण झाल्यानंतर सुपारीऐवजींसुद्धां गाजरेंच खायचा ! घरीं कुणीं आलें कीं, पाढा सुरू—'गाजरांत जितकें व्हिटामिन असतें तितकें—' अलीकडे त्याच्याकडे मुळीं फारसें कोणी येईनासेंच झालें !

असल्या विचित्र माणसाची व माझी ओळख कशी झाली तो प्रसंग सांगतों. खालील प्रसंग घडून आल्यानंतर मग मीं सहज

बारकाईनें त्याच्याबद्दल माहिती काढली ती वरीलप्रमाणें. ज्या प्रसंगानें त्याची माझी ओळख झाली ती हकीकत अशी—

मी सहज गच्चीवर उभा होतों. आमच्या घराला खूप मोठें आंगण होतें व आंगणांतच गुरांचा गोठा होता. त्यांत आमच्या दोन म्हशी बांधलेल्या होत्या व म्हशीचें पारडूं आंगणांतच उघड्या वर बांधलेलें होतें—

माझ्या वाड्यांतील एक जागा मोकळी होती व त्यामुळें दारा-वर 'जागा भाड्यानें देणें आहे' अशी पाटी होती.

संध्याकाळचा सुमारें पांच-साडेपांचचा सुमार होता.

इतक्यांत दरवाजाची दिंडी उघडून एक बाई आंत आली.

मीं चमत्कारिक नजरेनें तिच्याकडे पाहिलें.

तोंच आणखी एक मनुष्य आंत आला.

त्याच्याकडे पाहून माझ्या मनाला भयंकरच त्रास झाला.

नंतर एक नऊ वर्षांची मुलगी आंत आली. ती मुलगी आंत येतांच त्या गृहस्थानें तिला कडेवर घेतलें व तिला विचारलें, "बेबी, रुमाल कुठंय् तुझा ?"

मुलीनें खिशांतील रुमाल काढून हातांत घेत म्हटलें, "हा पहा पपा."

पपा-बेबी—! माणसें कांहीं ख्रिश्चन दिसत नव्हतीं. मला वाटलें आतां ही मुलगी आईला 'मा' म्हणून हांक मारणार. पण इतक्यांत एक गंमत झाली.

पण ती गंमत खरी मसालेदार वाटायला थोडें त्या त्रयीचें वर्णन करायला हवें !

ती स्त्री—

वय पंचवीस एक वर्षें, केस विरळ, आंबाडा म्हणायला मला लाज वाटते—सुपारीऐवढी केसांची गुंतावळ; त्यांत दोन डझन

आंकडे आणि डोक्याच्या लेव्हलपेक्षां एक इंच वर असा भरदार शेवंतीच्या फुलांचा गजरा !

सुरकुतलेला पण गौरवर्ण चेहरा. कपाळावर बारीकशी कुंकवाची टिकली. त्या टिकलीचा असा 'जादुमंतर' होत असे कीं, तिनें कपाळाला आंठ्या घातल्या कीं—आणि बोलायच्या वेळेला तिच्या कपाळाला हमखास आंठ्या पडत—कुंकू दिसेनासें होई ! म्हणजे आंठ्यांच्या लाटांत लुप्त पावे. पुन्हा कपाळाचा दरिया शान्त झाला, कीं कुंकवाचा चंद्र चमकूं लागे !

चेहऱ्यावर तर इतकें सौंदर्य होतें कीं, ही बाई जर हंसली तर काय भेसूर दिसेल या कल्पनेनेंच मला किंकाळी फोडावीसें वाटूं लागलें होतें !

येवढें सांगितल्यानंतर ती हडकुळी होती हें सांगायला पाहिजे का ?

जास्त वर्णन कशाला करूं ! तें एक जिवंत प्रेत होतें !

येवढ्यानेंहि पुरी कल्पना यायची नाहीं—तें क्षयानें झिजून झिजून मेलेल्या माणसासारखें दिसणारें जिवंत प्रेत होतें !

थांबा, नेसत्या जरतारी लुगड्याचें वर्णन करायचें राहिलें. रंग पारवा, मधून चमकणाऱ्या जरीच्या काड्या—सुंदर किनार—

पटकन् माझ्या मनांत एक बंडखोर विचार आला—

मजुरानें राबायचें आणि मालकानें श्रीमंतींत लोळायचें, हें जसें मनाला पटत नाहीं—

त्याप्रमाणें सुखलोलुप वृत्तीनें व ऐतखाऊपणामुळें–जिवंतपणाचें प्रेत करणाऱ्या माणसाला असले कपडे वापरायचा काय अधिकार ?

—कुणाला पटायचें नाहीं—पण मी म्हणतों, जोपासनेनें ज्यानें शरीर सुंदर ठेविलें असेल त्यालाच कपड्यांचा—फुलांचा विलास करण्याचा अधिकार असावा ! !

पुरे ! ! !

आतां यजमान—

वय अदमासें बत्तीस ! त्या स्त्रीला शोभण्यासारखा. डोळ्यांवर चष्मा, चष्म्याच्या कांचा व त्याचे दांडे इतके जाड, कीं नाठाळ जनावराच्या गळ्यांत जसें लोढणें अडकवतात तसा कांहीं चष्म्याचा उपयोग आहे कीं काय अशी शंका यायची ! तोंडाचा गौरवर्ण. रोजच्या रोज दाढी खरडल्यामुळें दाढीचें रान हिरवट व निबरट दिसत होतें. चेहरा इतका निर्विकार कीं, हा गृहस्थ जन्मांत एकदां तरी हंसला असेल का नाहीं हीच शंका प्रथम मला आली ! बरें, गृहस्थ दुर्दैवी म्हणावा तर बरोबर बायको व मूलहि झालेलें; तेव्हां कांहीं प्रसंग तरी निरतिशय आनंदाचे त्याला लाभलेले असावेत अशी कल्पना करायला कांहींच हरकत नाहीं ! पण ते प्रसंगहि या गृहस्थानें आपल्या जन्मजात सुतकी चेहऱ्यानें साजरे केलेले असावेत ! शेकाटेवजा शरीर आणि डबल ब्रेस्टचा कोट ! एखाद्या जनावरानें दुसऱ्या जनावराचें कातडें पांघरावें तशांतला प्रकार ! त्याच्याजवळ खरी जर कांहीं अलौकिक चीज असेल तर त्याचे डोळे ! ते मात्र खूप सतेज—शोधक आणि नजरेंत भरणारे होते ! आणि चालण्याची पद्धत—कसली कर्माची पद्धत ! ! एखादी गर्भारशीबाई जशी कसा तरी मार्ग क्रमीत असते त्याप्रमाणें ! म्हणजे माणसांनीं कांहीं अगदीं 'लेफ्ट-राइट'मध्यें चालायला नको ! आपला तो चालत होता येवढ्याकरितां म्हणायचें कीं, त्याचें शरीर पुढें पुढें सरकत होतें !

आतां ती मुलगी—

लहान मुलांकरितां जे जे कांहीं पदार्थ होते ते ते तिच्या अंगावर होते. (फक्त सोन्याचांदीचा डाग नव्हता ! ) बाकी जंपर, हंपर—झगा, ब्लाऊज—लोंकर—सर्व कांहीं होतें ! केसांची वेणी

इतक्या अनेक फांद्यांनीं घातलेली होती कीं, हिंदुस्थानांतल्या नद्यांचे उगम सुगम होतील; पण त्या फांद्यांचे धागेदोरे व खानेसुमारी कळणें अशक्य होतें ! ती मुलगीसुद्धां चेहऱ्यानें निर्विकार होती, पण अंगानें फोपशी, अवयवाला आकार नाहीं ! एखादी मूर्ति तयार करण्यापूर्वी अदमासानें चिखलाचे गोळे थापून जी मातीची आकृति ठोकळा म्हणून तयार करतात त्याप्रमाणें तें एक ओबडधोबड पण अर्धेकच्चें काम होतें !

चला. वर्णनांतच फार वेळ चालला ! आणि आख्यानहि फारसें मोठें नाहीं. तेव्हां लेंकराची जिज्ञासा सांगून मोकळें व्हावें !

पूर्वानुसंधान---

अशीं तीं तीन माणसें 'जागा भाड्यानें देणें आहे' ही पाटी पाहून माझ्या घरांत घुसलीं होतीं, व मी त्या वेळीं गच्चीवर उभा राहून त्यांजकडे पाहात होतों.

आतां त्या बेबीची ' लेंकराची जिज्ञासा ' सुरू झाली होती !

" पपा, हें कसलं हो झाड आहे ? "

" पारिजातकाचं ! "

" म्हणजे हो कसलं ? "

" ज्याला फुलं येतात असं तें एक झाड आहे ! "

" पण झाडं कशीं हो उगवतात ? "

" फुलांमध्यें झाडाचं बीं असतं तें केव्हां तरी जमिनीवर सांडतं आणि मग त्याचं झाड उगवतं, बेबी ! "

" मग आईच्या डोक्यावर कां हो नाहीं झाड उगवत, पपा ? "

" तिथं कसं बरं उगवेल, बेबी ! "

" कां बरं ? तिथं तर रोज फुलं असतात ! खरंच पपा, अलीकडे आईनें डोक्यांत वेणी घालतांना मीं कधींच पाहिली नाहीं ! का फुलं आपोआपच उगवतात हो तिथं हल्लीं ? "

" बेबी, आतां आपण घरीं गेल्यावर बोलूं हं पुढं ! "

" हें हो काय पपा—मग माझ्या लक्षांत राहणार नाहीं ! तुम्हीं सांगितलंत ना, कीं प्रत्येकाची माहिती विचारीत जा म्हणून ? "

बेबीला आतां घाम आला होता.

पपा घामानें निथळत होते.

आणि मातोश्री हळुवारपणानें स्वतःचा घाम पुशीत होत्या !

मग बेबीनें विचारलें, " पपा, तुम्ही घर कां हो बांधीत नाहीं ? "

" घर बांधायला पत्रे, लांकूड, विटा लागतात." पपा म्हणाले.

" विटा कोण करतं ? " बेबी म्हणाली.

" कुंभार ! "

" पण त्याला पैसे द्यावे लागत असतील; पण खरंच, तुम्ही हो कां नाहीं विटा तयार करीत पपा ? "

अशा संवादांतून ते म्हशीच्या गोठ्यापर्यंत यायला अर्धा तसा लागला. वाटेंत आणखी दोनचार 'जिज्ञासा' उद्भवल्या होत्याच. आतां बेबीनें म्हैस पाहिली.

बेबीला गवळी माहीत होता, पण अद्याप तिनें प्रत्यक्ष म्हैस अशी पाहिली नव्हती. तिनें विचारलें, " पपा—हें काय आहे ? "

" म्हैस. "

" आणि हें हो काय ? बारकी म्हैस होय ? " पारडीकडे बोट दाखवीत बेबीनें विचारलें.

" तिला पारडी म्हणतात ! "

" पारडी म्हणजे काय ? "

" म्हशीचं मूल ! "

" मूल म्हणजे काय ? "

आतां सद्गृहस्थ लाडांत आले होते. ते बेबीला कुरवाळीत

म्हणाले, " अग, मूल म्हणजे काय तें कळत नाहीं तुला ? जशी तुझ्या आईला तूं तशी या म्हशीला पारडी ! "

आतां मला न हंसणें अशक्य झालें होतें ! मी खोखो हंसतच खालीं आलों.

तो गृहस्थ माझ्याजवळ आला, आणि एखादी बायको नवऱ्याजवळ खर्चायला लाडांत पैसे मागते तशा स्वरांत व प्रत्येक शब्दांत विश्रांतीचें स्टेशन बनवून तीन मिनिटांत त्यांनीं एक वाक्य पुरें केलें—" जागा—भाड्यानं—द्यायची—आहे—ना—आपल्याकडे ? "

त्या गृहस्थाला मीं जागा दाखवली. पण बोलणें शक्य तितकें टाळीत होतों. कारण मला भयंकर हंसूं येत होतें !

" काय भाडं आहे या जागेचं ? "

तें बिऱ्हाड मला नको होतें म्हणून मीं दुप्पट भाडें सांगितलें, " चवतीस रुपये ! "

तरीहि बेट्यानें जागा पसंत केली. कारण स्वतंत्र फ्लशिंगचे हे—व बाथरूम—! ! आतां काय करावें ?

आलें होतें एक वेळ मनांत, द्यावी जागा—पण पटकन् त्या लेंकराच्या भयंकर जिज्ञासेची आठवण झाली आणि वाटलें कीं, मी एखाद्या वेळेला घाईनें बाहेर पडायला आणि त्याच वेळीं या लेंकराच्या भयंकर जिज्ञासेनें उचल खाऊन जर माझाच वस्तुपाठ चालू झाला तर—? ?

कांहीं तरी थापा मारून त्याला दिला घालवून आणि नंतर त्याची सहज बारकाईनें चवकशी केली; तर कळलें कीं, त्याला सहा सहा महिने एक एक फिट येत असते ! गेली सहामाही होती—'व्हिटामिन्सची'; चालू सहामाही होती—

'लेंकराच्या जिज्ञासेची ! !'



# पक्ष्यांची संस्कृति

चिमणी नेहमीं पाहायला मिळते. खिडकींतून चिंवचिंव करीत ती घरांत शिरते, पंखांची फडफड व तोंडानें चिंवचिंव करीत इकडे तिकडे फिरते—चार-दोन दाणे सांपडल्यास ते टिपून घेऊन पुन्हा बाहेर उडून जाते !

तिचा रंगहि कांहीं मोठा मजेदार असतो असें नाहीं. पण तिचा तो चिमणा देह, धीट नजर व चपल हालचाल मोठी गंमतीदार वाटते.

मला वाटत होतें, कीं 'चिमणी' या विषयावर मी येवढेंच लिहूं शकेन. पण एका प्रसंगावरून माझें हें मत साफ बदललें; आणि मी आतां असें स्पष्ट म्हणूं शकतों कीं, " चिमणी ही जात फार भयंकर आहे. नुसतें खाणें—पिणें—जगणें—जगविणें एवढेंच त्या करीत नाहींत. त्यांना समजत नसलें तरी चांगलेंच उमजतें आणि पांखरांनाहि कांहीं तरी बरी-वाईट संस्कृति असते !

× × ×

एका सुटींत मी एका परगांवच्या मित्राकडे गेलों होतों. त्या गृहस्थाला सत्तेचें घर, घराच्यापुढें थोडीशी बाग— आणि जवळच त्याची शेतवाडी होती.

त्या गृहस्थाची पत्नी हयात नव्हती. एक चिमणें बालक आपल्या नवऱ्याच्या सान्निध्याला ठेवून तिनें परलोकीं प्रयाण केलें होतें. त्या बालकाचें नांव होतें गणपति.

गणपतीच्या वडिलांचें नांव होतें रामचंद्र. हा माझा लहानपणाचा मित्र.

वेळ होती सकाळीं आठ-नऊच्या सुमाराची. चहापाणी घेऊन आम्ही बाहेर अंगणांत घोंगडी टाकून बसलों होतों. आमची दृष्टि फारशी व्यापक नसल्यामुळें आमचा बोलण्याचा विषय 'सुधारणा' हा नव्हता. आम्हीं व्यवहारी माणसें, 'धान्याचे भाव व आमचे स्नेही-सोबती' हाच आमच्या गप्पांचा विषय होता. गणपतित्याचें वय आतां अकरा वर्षांचें होतें—आमच्या जवळपासच कांहींतरी खेळत होता. आमच्या गप्पा-गोष्टींत त्याचें लक्ष लागणें शक्य नव्हतें.

तो आपल्या वडिलांना म्हणाला. "भाऊ, मी आतां खेळायला जातों—"

रामभाऊ म्हणाले, "वारे वा ! मग या पाहुण्यांना—आपलं शेत कोण दाखविणार ?"

अंगणांतच एक मोठें आंब्याचें झाड होतें. त्यावर एक दोन पोपट येऊन बसले होते.

"भाऊ, मी पोपट सांपडला तर पाहतों—" असें म्हणत गणपति अल्लडपणानें तेथून निघून गेला.

आमची याप्रमाणें बोलण्यांत दहापंधरा मिनिटें गेलीं.

मग रामभाऊंनीं गणपतीवर व्याख्यान सुरू केलें. "असा पोर अवखळ आणि व्रात्य आहे म्हणतोस—पांखरें धरण्यांत तर फार पटाईत ! रानांतले दगड धुंडाळून विंचूच पकडून आणतो. पोपट पकडतो, काय वाटेल तें करतो. पण मीं त्याच्या व्रात्यपणाच्या वाटेला कधींच जात नाहीं. कारण, मीं त्याला जीं कांहीं नित्यनैमित्तिक कार्यें सांगितलीं आहेत त्यांची वेळ तो कधींच चुकवीत नाहीं—आणि स्वतःचाच पोर आहे पण अभिमानानें सांगतों,

त्याला खोटें अजिबात खपत नाहीं. तो कधीं कुणाच्या वाटेला जात नाहीं– आतां आहे थोडासा हूड—"

इतक्यांत दमला-भागलेला गणपति धांपा टाकीत आला व वडिलांना बिलगून बसला.

"काय रे गणू, कुठें आहे पोपट ?"

"आज नाहीं सांपडला !" लाजऱ्या स्वरांत गणू खालीं मान घालून म्हणाला.

"शाबास ! आतांच मी तुझी हुशारी यांना सांगत होतों– तों आज फजितीच का ?

"मग नाहीं सांपडला त्याला मी काय करूं ?"

"आतां हे पाहुणे म्हणतील कीं, उगाचच मीं तुझी तारीफ केली—"

"मग मी त्यांना एक गंमत दाखवूं का ?"

"काय दाखवणार गंमत—"

"परवां किनई–मला एक पोपटाचं अंड सांपडलं—"

'हं–' रामभाऊंनीं माझ्याकडे पाहून माझी उत्कंठा जागृत करण्याचा प्रयत्न केला.

"मग काय केलंस त्या अंड्याचं तूं ?"

एका विवक्षित जागेकडे बोट दाखवीत गणपति म्हणाला, "तिथं एका चिमणीचं घरटं आहे– तिथं चिमणीचीं अंडींहि आहेत– त्यांत मीं तें नेऊन ठेवून दिलं !"

इतक्यांत रामभाऊंच्याकडे कोणीतरी आले. गणपति चिमणीच्या घरट्याकडे निघून गेला.

आम्ही तिघेजण तिथेंच बोलत बसलों होतों.

अशांत पांचदहा मिनिटें गेलीं.

इतक्यांत गणपति घाबऱ्या घाबऱ्या "भाऊ–भाऊ–" असें ओरडत तिथें आला.

रामभाऊंनीं विचारलें, "काय रे झालें ?"

गणपति घाईघाईनेंच म्हणाला, "चला–तिकडे चला अगोदर–" आणि तो घरट्याकडे पळून गेला.

आम्हीहि त्याच्या पाठोपाठ गेलों तों—"चिंवचिंवण्याचा" आवाज ऐकूं आला.

चिमणीचें घरटें मोडून खालीं पडलें होतें. एक दोन चिमणीचीं पिलें व त्यांतच एक पोपटाचें पिलूं खालीं जमिनीवर विव्हळत पडलें होतें आणि त्या घरट्याची मालकीण ती चिमणी––

तिची अवस्था तर भयंकर होती––

पांच-पंचवीस चिमण्या तिथें गोळा झाल्या होत्या ! त्यांचा तोंडानें कर्णकर्कश चिंवचिंवाट चालू होता आणि सर्वजणी त्या घरट्याच्या मालकिणीला–त्या गरीब चिमणीला–चोंची मारीत होत्या ! ती चिमणी केंविलवाण्या नजरेनें पाहात होती !

आम्ही जवळ आलों तरी जमलेल्या चिमण्या घाबरल्या नाहींत–त्यांचें त्या चिमणीला चोंची मारण्याचें काम चालूच होतें–आणि तशांतहि त्या पोपटाच्या पिलांकडे विषारी नजरेनें पाहात होत्या!!

त्या दुर्दैवी चिमणीनें चोंच वासली !

जमलेल्या चिमण्या—चिंवचिंवाट करीत निघून गेल्या !



# तडजोड

वादविवादाचीं कांहीं कांहीं स्थळें ठरलेलींच असतात. त्याप्रमाणें प्रभाकराच्या लग्नाचा विषय निघतांच त्याचें घरांतल्या माणसांशीं पटेनासें झालें. त्याचा लाडका हटवाद कांहीं विशेष महत्त्वाचा होता असें नव्हे; पण त्याचें म्हणणें एवढेंच होतें कीं, आपल्याला बी. ए. झालेली मुलगी पाहिजे !

बऱ्याच वादविवादानंतर, पुष्कळसे रुसवे-फुगवे झाल्यानंतर, वडिलांनीं संमति दिली आणि पुष्कळशा मुली पाहिल्यानंतर कमलिनी बी. ए. प्रभाकराची अर्धांगी म्हणून ठरली !

प्रभाकर दुसऱ्या गांवीं नोकरीनिमित्त गेला. दोघांचाहि संसार सुखाचा होता. पहिल्या ओळखींत बहुधा कुणाचेंच कुणाविषयीं वाईट मत होत नाहीं. त्याचप्रमाणें प्रभाकर आणि कमलिनी यांचें झालें होतें. दोघांनाहि वाटे, जगांतलें सुखी दांपत्य असें आपलें एकच आहे !

पण तो पहिला बहर ओसरला. पहांटे लावून ठेवलेला दिवा प्रभात होतांच जसा हळूहळू मलूल वाटतो व सूर्याचे किरण पडूं लागल्यानंतरहि जर तो दिवा तसाच तेवत ठेवला किंवा राहिला तर त्या दिव्याचा प्रकाश थोडासा किळसवाणाच वाटतो—त्याप्रमाणें अनोळखीपणाच्या पहिल्या दिवसांत एकमेकांच्या नात्याच्या, सौंदर्याच्या, अभिलाषाच्या दिव्याच्या उजेडांत— पहिल्या पहिल्या ओळखींत— एकमेकांच्या पूर्वायुष्याच्या आठवणींच्या चांदण्यांत दिवस मोठे मजेंत गेले. पण त्या अस्फुट चांदण्याचा दाट ओळखीच्या रूपानें उजेड झाला ! चांदण्याचा—स्वतःचाच विसर पाडणारा

मनोहरपणा नाहींसा झाला! स्पष्ट ओळखीचा सूर्य उदयाला आला! तसें प्रत्येकाचें स्वतंत्र व्यक्तित्व जागृत झालें!

× × ×

प्रभाकराला सव्वाशें रुपये पगार होता. कमलिनीच्या हौसा नाना तऱ्हेच्या! पण त्या हौसांकरितां नवऱ्याजवळून लहान मुलासारखें पैसे मागून घेणें तिला कमीपणाचें वाटूं लागलें.

तेव्हां एक दिवस तिनें प्रभाकराला विचारलें, "दुपारचा वेळ कसा तरीच काढायचा, तें मी नोकरी करतें!"

कसें कुणास ठाऊक, पहिल्याच प्रश्नांत प्रभाकरानें होकार दिला. नोकरीची खटपट चालू झाली. कमलिनीला मुलींच्या शाळेंत मास्तरिणीची नोकरी मिळाली.

अर्थात् घरांत स्वैपाकाची बाई आली.

कमलिनीच्या नोकरीचा व्याप वाढूं लागला, तसतशी तिची घरांतली आस्था कमी झाली. दर महिन्याला घरांत नवीन नवीन जिन्नस येऊं लागले. या महिन्याला फोनोग्राफ, दुसऱ्या महिन्याला शालू, रंगी-बेरंगी पातळें—नाना तऱ्हा!

तिच्याकडे मैत्रिणी यायच्या. प्रभाकर आफिसांतून घरीं आला तरी कमलिनीचें त्याच्याकडे लक्षच राहीनासें झालें. लग्नाचींच नवरा-बायको—पण प्रसंगोपात्त जर एखाद्या धर्मशाळेंत उघड्यावर राहिलीं तर जो त्रयस्थपणा त्यांच्यांत निर्माण होतो तशीच त्या दांपत्याची स्थिति झाली होती! फरक एवढाच कीं, त्या सार्व-जनिक धर्मशाळेंत व्यवस्थेची आबाळ होते आणि ही त्यांच्या घरची धर्मशाळा सुसज्ज होती!

प्रभाकरानें त्या मानानें बरेंच आत्मसंयमन केलें. हें सर्व तो मुकाट्यानें सहन करी. याची जाणीव कमलिनीलाहि वाटूं लागली. पण—

अशांत प्रभाकराची आई आजारीपणामुळें त्याच्याकडे येऊन राहिली. मातोश्रीनें चार दिवसांतच ओळखलें कीं, प्रभाकर सुखी नाहीं. तिनें प्रभाकराला खिजविण्याकरितां थट्टेनें म्हटलें, " प्रभा, या बायकोपासून जर तुला सुख होत नाहीं तर दुसरें लग्न कर–"

× × × ×

योगायोगाची गोष्ट. मायलेंकरांचा हा संवाद कमलिनीनें ऐकला. तिच्या अंतःकरणांत अस्वस्थता अगोदरपासून निर्माण झालेली होतीच ! त्यांत त्या संवादाची भर पडली. तिच्या अंतःकरणाचा भडका उडाला. तिचे विचार अनावर झाले–तिला तें सहन होईना ! काय करावें ? कुठें जावें ? यांतून वाट कशी काढावी ?

पण तिनें बंधमुक्त होण्याचा विचार ठरविला नाहीं ! तिला वाटलें, 'यांतच तडजोड काढली पाहिजे' कारण तिची वृत्ति लेखकी थाटाची नव्हती ! तिला सगळ्या जगाचा विचार करून उत्तर काढायचें नव्हतें ! तिला स्वतःपुरतेंच पाहायचें होतें. बेछूट विचारांची नायिका कादंबरींत लोकप्रिय होईल; पण सत्य सृष्टींत ?– ती ताडकन उठली व कोरा कागद घेऊन तिनें नोकरीचा राजीनामा खरडला. शाळेंत पाठवून दिला आणि प्रभाकराला एकीकडे बोलावून ही गोष्ट तिनें त्याला समक्ष सांगितली !

पण त्यामुळें—

एखाद्या समारंभांतील वाद्यें एकदम बंद झालीं कीं, लगेच ज्याप्रमाणें किंचित् गंभीर वातावरण निर्माण होतें, त्याप्रमाणें कमलिनीच्या मनाची स्थिति झाली. स्वतः हौसेनें पत्करलेल्या मास्तरिणीच्या नोकरीचा तिला राजीनामा द्यावा लागला होता. तिला वाटलें, आपण आपल्या कर्तबगार आयुष्याचाच राजीनामा दिला आहे !

प्रभाकराची आई, म्हणजे कमलिनीची सासू, दुसऱ्या दिवशींच गांवीं निघून गेली. आपल्या सासूनें आपल्या नवऱ्याला दुसरें लग्न करण्याचा सल्ला द्यावा याचें तिला वैषम्य वाटलें.

दोन चाळी समोरासमोर असाव्यात. अलीकडच्या चाळींत राहणाऱ्या एखाद्या दांपत्यापैकीं स्त्रीनें सहज खेळण्याकरितां समोरच्या चाळींत जावें; अशांत तिचा पति परत घरीं यावा. पति दरवाजांत उभा आहे—समोरच्या चाळींत गेलेली स्त्री पतिस्वागताकरितां उत्सुकतेनें उठलेली आहे—एकमेकांची नजर एकमेकांना भिडलेली आहे पण—

एकदम वळवाचा पाऊस सुरू व्हावा आणि त्या स्त्रीला मनांत इच्छा असून ताबडतोब परत येतां येऊं नये आणि पाऊस बंद होतांच किंवा छत्री पैदा करून त्या स्त्रीनें लज्जेच्या विनयानें आपलें सौंदर्य प्रफुल्लित करून पटकन घरांत यावें. मग सुरुवातीच्या संवादाला जसा थोडासा खडबडीतपणा येतो—तो संवाद मोकळेपणाचा असत नाहीं—त्याप्रमाणें प्रभाकर व नलिनी यांची स्थिति झाली होती !

दोघेंहि मनमोकळें बोलायला अगदीं उत्कंठित झालीं होतीं; पण दोघेंहि बोलण्याचें टाळीत होतीं. पण असें कटु वातावरण किती दिवस टिकणार ? व्यवहारांत ज्याप्रमाणें हवापाण्याचीं निरर्थक प्रश्नोत्तरें झाल्यानंतर आपण मुद्दयावर येतों—त्याप्रमाणें एकदोन दिवस बरींच निरर्थक प्रश्नोत्तरें झाल्यानंतर तीं दोघें मनमोकळेपणें बोलूं लागलीं !

" कमलिनी," प्रभाकरानें हांक मारिली

" काय ? " अंधारांत हातांत असलेली इलेक्ट्रिक बॅटरी खालींवर करीत ज्याप्रमाणें आपण भोंवतालची परिस्थिति न्याहाळतों

त्याप्रमाणें डोळ्यांची नजर खालींवर फिरवीत कमलिनी प्रभाकराच्या अंतःकरणाचा ठाव घेत होती.

" कमलिनी, मला क्षमा कर. मी थोडासा कां पुष्कळ स्वार्थी आहे." प्रभाकर समजुतीच्या स्वरांत म्हणाला.

" पण मी म्हणतें, तो विषयच अजिबात सोडून द्यावा गडे! झाली गोष्ट होऊन गेली."

" पण त्या गोष्टीच्या आठवणीचं शल्यहि मनांत राहूं नये म्हणून मनमोकळेपणानें बोललेलं बरं. "

" पण आज नको गडे."

त्या दिवशीं तो विषय तितकाच राहिला.

आतां त्या नवरा-बायकोंमधील वातावरण बरेंच शान्त झालें होतें; आणि पाऊस थांबल्यावर गार वारा सुटून हवेंत जशी शान्तता येते त्याप्रमाणें त्यांचें आयुष्य चाललें होतें; पण अजून मनमोकळेपणाचा सुवास त्या प्रसंगांत नव्हता!

प्रभाकर कधीं तरी नोकरीचा विषय काढी आणि त्यावर कमलिनी कुरकुरून म्हणे, " पण मी अशीच नोकरी करीत राहिलें असतें तर त्यांत काय बिघडलें असतें? आपली नुसती कल्पना हं! आतां आपण सांगितलंत तरी मी नोकरी करणार नाहीं! "

" हं. असा हटवादीपणा मला आवडेल! कमलिनी, लक्षांत ठेव, माणसाला महत्त्वाकांक्षा पाहिजे ही गोष्ट जितकी खरी आहे तितकीच त्या महत्त्वाकांक्षेला मुरड पाहिजे हीहि गोष्ट खरी आहे! तूं मिळविलेल्या पैशांतून शाल घेतलीस, बाजाची पेटी घेतलीस—हें वैभव—याला मी थोडासा जडसुखवाद म्हणेन! तूं जन्मभर जरी नोकरी केली असतीस तरी किती तरी वैभव मिळवायचें राहिलेंच असतें! मग एवढ्या वैभवाला मोटार पाहिजे! त्याला शोफर पाहिजे—एक ना दोन, हजारों गोष्टी! पण ही नुसती

वैभवाच्या पाठीमागची धांवपळ झाली ! या धांवपळींत खरं सुख कधींच हातीं आलं नसतं. आपलं तें जीवन यांत्रिक झालं असतं—नव्हे होत चाललंच होतं ! खरं ना हें ? मानवी अपूर्णतेंत-कमतरतेंत सुखाचे पुष्पपराग असतात ! आतां तूं नोकरी सोडल्यामुळं माझी पैशाची अडचण होईल थोडीशी; पण या अडचणींत तुला लुगडं घेण्याचा प्रसंग आला, मला पंधरा रुपयांचंच लुगडं घ्यायची सवड आहे आणि तुझी इच्छा आहे पंचवीस रुपयांचं घेण्याची, तशांत माझी एखादी गरज कमी करून मी तुला पंचवीस रुपयांचं लुगडं घेण्यांत व तुला तें मिळण्यांत दोघांच्या मनाला जें समाधान आहे तें तूं परस्पर मिळवून बेपर्वाईनें घेण्यांत नाहीं ! आणि माणसाच्या हातांत स्वतःच्या कमाईचा पैसा आला कीं, वृत्ति थोडीशी बेछूट होतेच ! दांपत्याचं खरं सुख एकमेक एकमेकांकरितां किती सात्त्विक त्याग करतात त्या प्रमाणांत आहे ! बिन जिव्हाळ्याचं नुसतं वैभव म्हणजे सूर्याच्या बारा वाजतांच्या उन्हाचा रखरखीतपणा आहे ! कमलिनी, पटतं ना मी तुला काय म्हणतों तें ? ”

“ पण हें बोलणं काढलंतच कां मुळीं आपण ? माझ्या अलीकडच्या वागणुकीवरून मी नाखुष आहे असं कधीं तरी वाटतं का आपल्याला ? ” कमलिनी म्हणाली.

“ पण मीं बोलणं एवढ्याकरितांच काढलं कीं, मी तुझ्यावर नोकरी सोडण्याची सक्ती केली असं तुला वाटूं नये ! सांसारिक सुख हें स्वर्गसुखाचीहि बरोबरी करणारं सुख आहे ! आणि हें बघ, आईनं मला लगेच दुसरं लग्न करायला सुचविलं; पण कमलिनी, तुला वाटतं का मीं दुसरं लग्न केलं असतं म्हणून ? ”

“ मीं तसं कधीं म्हटलं पण ? इतकी का आपल्या हृदयाची पारख

मला नाहीं ? आणि तसं असतं तर मींहि नोकरी करण्याचा हट-वादीपणा न सोडतां खुशाल नोकरी करून स्वतंत्र राहिलें असतें ! माझ्या नोकरीमुळं आपल्या गैरसोई होत होत्या हें मलाहि कळत होतं, पण एकदां मनुष्य चक्रांत सांपडला म्हणजे जसं त्याला त्या चक्राकार गतीनं फिरावं लागतं, त्याप्रमाणंच माझं झालं होतं ! त्या वेळीं आपण किती तरी सहन केलंत ! आपण स्वयंपाकाला बाई ठेविली होती—मीं पाहिल्यांदा ठरविलं होतं कीं, बाई ठेवली तरी वाढप मीच करीन; पण मला कंटाळा येई आणि स्वयंपाकाची बाई आपल्याला वाढायला लागली कीं, मला तिचाच हेवा वाटायला लागे ! आपल्या माणसाला वाढण्यांतहि काय समाधान असतं ! म्हणूनच स्त्रियांना अन्नपूर्णा म्हणत असतील बहुतकरून ! आणि कामधंद्यामुळं माझी वागणूकहि थोडीशी बेपर्वाच होत चालली होती. मनांत टोंचणी होती माझ्या, कीं हें स्त्रीजीवन नव्हे ! आणि आपण हें सर्व विशेष कुरकुर न करितां सहन केलंत म्हणूनच मला त्या दिवशीं गहिंवरून आलं आणि त्याच आवेगांत मीं नोकरीचा राजीनामा दिला ! ”

“ कमलिनी, गरुडाची भरारी निराळी— आपण साधींभोळीं चिमणीं पाखरं ! गरुडाची भरारी आपणांस कशी झेपेल ? आपण या झाडावरून त्या झाडावर चिवचिव करीत फिरणं हेंच आपलं जीवन ! आत्मविश्वास— स्वतःबद्दलचा अभिमान असावा; पण त्यालाहि मर्यादा पाहिजे ! कमलिनी, एका अंतःकरणाचे चिरून दोन तुकडे करावे त्याप्रमाणं परमेश्वरानं स्त्री-पुरुष या एकच साथ करणाऱ्या दोन चिपळ्या अगर झांजा बनविल्या आहेत ! यांतील कुणाहि एकाच्या जीवनांत दुसऱ्याच्या सान्निध्याशिवाय स्वारस्य निर्माण होत नाहीं ! स्त्री-पुरुषांत परस्परांबद्दल नैसर्गिक आकर्षणच इतकं आहे कीं, तिथं भेदभावाचा प्रश्नच निर्माण होत नाहीं ! ही

सहृदय जोडप्याची गोष्ट सांगत मी आहे; आणि जिथं सहृदयपणा नसेल तिथं तात्त्विक नाटकी वाद उपयोगी पडत नाहींत ! स्त्री-स्वातंत्र्य– समता जरूर नाहीं या शब्दांची ! आज तुमच्या दृष्टीनं हिंदु स्त्रियांची दुर्दशा आहे ना; पण आज पैजेनं असे किती पुरुष मी तुला दाखवूं कीं, ज्यांना त्यांच्या बायका लाक्षणिक अर्थानं कान धरून उठाबशा काढायला लावीत आहेत ? तेव्हां कोणत्याहि समाजाची सुधारणा–स्थिति–विचार हे कसेहि असले तरी माणसाला जें सुख मिळतं तें त्याच्या विशेष प्रकारच्या व्यक्तित्वावर मिळत असतं ! याचा विचार पाश्चात्य विचारांच्या मादकपणाच्या धुंदींत असलेल्या कांहींना नसतो–! ''

'' पण हें व्याख्यान मला आतां काय म्हणून ऐकवीत आहांत ? एकदां शुद्धिकरण झाल्यानंतर पूर्वधर्माची चर्चा पाहिजे कशाला ? '' कमलिनी लडिवाळपणानें म्हणाली !

'' तें शुद्धीकरण कायम टिकावं म्हणून ! '' प्रभाकरानें हंसत उत्तर दिलें !

× × ×

मित्रामित्रांत एकदां कडाक्याचें भांडण झालें व पुनः त्यांची मैत्री झाली कीं, त्यांत विशेष स्वारस्य व जास्त कायमपणा येतो. त्याप्रमाणें आतां त्या दांपत्याचें झालें होतें. दोघेंहि एकमेकांवर कमालीचीं खूष होतीं ! व दुसऱ्याकरितां स्वतःच्या मनाविरुद्ध जाणूनबुजून वागण्यांत जें एक विशेष समाधान असतें त्याचा निरुपम आनंद आतां कमलिनी अनुभवीत होती !

× × ×

असे बरेच महिने गेले. बागेंत स्वच्छ चांदण्यांत सुखानें बसलों असतांना एखादा डांस गुणगुण करून सुखांत तलीन होऊन बेभान बसलेल्या आपल्याला तों डांस जशी त्या सुखाची आठवण

करून देतो त्याप्रमाणें सांसारिक सुखाच्या बागेंत व एकमेकांच्या दिलजमाईच्या चांदण्यांत तें जोडपें वावरत असतांना नोकरीच्या प्रश्नाचा डांस कधीं कधीं मधून मधून गुणगुण करतोच !

× × ×

एक दिवस सहज कमलिनी म्हणाली, "मला आतां पूर्ण समाधान आहे; पण आजूबाजूचे लोक व कित्येक मैत्रिणी मला म्हणतात कीं, येवढी बी. ए. झालीस पण मतस्वातंत्र्याला कुठं जागलीस ? अखेर नवरेपणा गाजविला गेलाच कीं नाहीं तुझ्यावर ?"

"मग त्यावर आमच्या बाईसाहेबांचं काय म्हणणं आहे ?"

कमलिनी समाधानाच्या तल्लीनतेंत स्वतःच्या केसांशीं खेळत म्हणाली, "असले तर्क-कुतर्क काढणं ज्याच्या त्याच्या मनः-प्रवृत्तीवर अवलंबून आहे !" असं म्हणून मी त्यांना मनुष्य व सिंह एकमेकांचीं चित्रें कशीं काढतील या इसापनीतींतील गोष्टीची आठवण करून दिली आणि सांगितलं कीं, आम्ही व्याव-हारिक विचार करून 'त्वयार्धं मयार्धम्' या न्यायानं सिंहानं माणसाच्या अंगावर मान टाकिली आहे आणि मनुष्य लाडिक-पणानं त्या सिंहाची आयाळ गोंजारीत आहे असं चित्र काढलं आहे! जहाल विचारवंतांना हें पटणार नाहीं; पण आम्हांला हें पटलं आहे आणि वैचित्र्य हाहि जगाचा एक धर्मच आहे !" बरोबर होतं ना माझं म्हणणं ?"

"अग, तुझ्या माझ्या विचारांच्या तारा इतक्या एकतानतेंत रंगल्या आहेत कीं, त्यांत तुझा सूर कोणता आणि माझा कोणता हें चिकित्सक मार्मिक तज्ज्ञालाहि कळणार नाहीं !"

× × ×

आतां तें दापत्य पूर्ण सुखांत आहे. लागलेल्या सतारीचें महत्त्व जसें गवयाला ठाऊक त्याप्रमाणें सुखी दांपत्याचें जीवन--

गोष्टीचा शेवट व्यावहारिक करावयाचा झाला तर सांगतां येईल कीं, कमलिनीला दोन-चार महिने लवकरच माहेरीं जावें लागणार आहे; पण इथेंच पुरे. नाहीं तर एखादा महाभाग म्हणावयाचा कीं ही काय ब्याद आहे!!



" ज्या मुलीवर माझं प्रेम नाहीं अशा मुलीची धोंड बापुसाहेबांनीं माझ्या गळ्यांत बांधली—"

" आणि तूंहि बांधूं दिलीस ! बरं, या तुझ्या बायकोवर तुझं प्रेम कां नाहीं ? कांहीं कारण सांगशील का ? "

" कारणं सांगतां येणार नाहींत ! " तो म्हणाला.

" म्हणजे कांहीं कारणं नाहींत, हाच त्याचा अर्थ. माझं मन फारसं चोखंदळ नाहीं. आणि मला वाटतं, तूं मनाचा सरळपणा सोडला नाहींस तर या बायकोबद्दलहि तुला प्रेम वाटूं लागेल ! ज्या ज्या शरिरांत हालचाल करणारी ईश्वरी शक्ति आहे तीं तीं शरीरं कोणत्याहि सजीव माणसाचं आज ना कालान्तरानं प्रेम संपादन करूं शकतात ! माणसांची गोष्ट सोडून दे, तुझ्या शेजाऱ्याचा एखादा कुत्रा तुझ्याजवळ आला तर तूं त्याच्या पाठीवरून प्रेमानं हात फिरवशील ! येवढ्या सहवासानं तो कुत्रा दुसऱ्या दिवशीं पुन्हा तुझ्याजवळ येईल—आणि अशा तऱ्हेनं—कुत्रा आणि माणूस दोस्त बनतील–! मग तुझी बायको तर माणूस आहे. स्त्री आहे–शिकलेली आहे आणि मला वाटतं—"

" परदुःख शीतळ असतं, बाबा ! " गंभीरपणानें उसासे टाकून तो म्हणाला.

नंतर सहा महिने गेले. 'तो' आणि त्याची 'ती' हीं दोन माणसें अद्याप एकमेकांवर प्रेम करूं शकत नव्हतीं ! तिचें मात्र त्याच्यावर प्रेम होतें ! अर्थात् तें प्रेम व्यवहारी नव्हतें !

प्रेम म्हणजे व्यवहार नव्हे ! पाण्याची धार जशी खालीं पडायची हा नैसर्गिक धर्म, त्याप्रमाणें नवऱ्यावर प्रेम करायचें येवढेंच तिला माहीत होतें. अलीकडचे चवचाल विचार तिला माहीत नव्हते !

कांहीं दिवसांनीं असे शब्द ऐकायला येतील कीं, एक स्त्री अगर

रुष आपल्या मैत्रिणीला अगर मित्राला म्हणेल, " मी त्यांच्यावर २* आणे किंमतीचं प्रेम करीत असतांना त्यांचं मात्र माझ्यावर ० आणे किंमतीचं प्रेम आहे; हा काय व्यवहार झाला ? आतां । महिनाभर पाहतें नाहीं तर पुढच्या महिन्यापासून मी त्यांचा ड म्हणून ते माझ्यावर १० आणे किंमतीचं प्रेम करीत असतांना ां त्यांच्यावर फक्त ६ आणे किंमतीचं प्रेम करीन ! " आणि ांहीं दिवसांनीं प्रेमाचें थर्मामिटर अगर तराजू निघेल ! आणि ग प्रेम भराभर मापून निघेल !

—पण ते पुढच्या पिढीचे प्रश्न आहेत. त्याच्या अगोदरच ला मरायचें आहे; तेव्हां त्याचा विचार मी कशाला करूं ?

आतां त्याच्या बहिणीचें लग्न ठरलें होतें. बापुसाहेबांच्या कसें ानांवर गेलें कुणाला ठाऊक ! आपला मुलगा बायकोशीं नीट ागत नाहीं हें बापुसाहेबांना कळलें. त्यांनीं संतापानें आपल्या लाला हांक मारली व आज्ञा फर्मावली, " जा रे, त्या चार घरीं क्षत द्यायची राहिली आहे, तेवढी तुम्ही दोघंजणं जाऊन ऊन या ! "

१२४ अ कलमच तें ! ताबडतोब लागू झालें. 'तो' आपल्या ते'ला घेऊन अक्षत देण्याकरितां बाहेर पडला !

तसा तो मिस्किलच. दरवाजाबाहेर पडेपर्यंत तो नीट वागला. ण दरवाजाबाहेर पडतांच तो जो झपाट्यानें पुढें झाला तो पुढें आपल्यांत आणि तिच्यांत' पंधरा फुटांचें अंतर ठेवून चालूं ागला. तशी तीहि चिडली; आणि परत येतांना घराच्या बऱ्याच ालीकडे अडूनच उभी राहिली ! तसा तो खजील झाला. त्यानें

---

* आणि राहिलेलें ४ आणे प्रेम ?

पंधरा फुटांचें अंतर कमी केलें तशी ती चालूं लागली; पण त्यामुळें तो मनांतून चिडला.

तो अंतर तोडून तिच्याजवळ कां गेला ?

कारण लहानपणीं शाळेंत असतांना त्यानें शाळेंत नेलेली छत्री हरवली होती; त्याबद्दल बापुसाहेबांनीं त्याला मारलें होतें. तो प्रसंग त्याला आठवला ! निर्जीव छत्री हरविल्याबद्दल जर मार तर बायको—

लग्नसमारंभ पार पडला ! त्याची बायको तशी सुंदर होती; पण मनानें भलताच हेका घेतलेला असला म्हणजे कावीळ झाल्याप्रमाणें होतें. आपल्या बायकोकडे पाहाण्यांतहि तो तिरस्कार मानीत होता. तो मनांत म्हणे, "बापुसाहेबांनीं कसलं ध्यान माझ्या गळ्यांत बांधलं आहे !"

× × ×

नंतर सुमारें दोन महिन्यांनीं तो माझ्याकडे अत्यंत उल्हासानें आला; व आल्याबरोबर बेफामपणानें हंसत मला म्हणाला, "दोस्त, आयुष्याची शर्यत जिंकली ! माझ्या बायकोवर माझं अत्यंत प्रेम बसलं आहे ! आणि त्याला आज दोन दिवस झाले !"

मी आठवूं लागलों, दोन दिवसांत धरणीकंप झाल्याचें अगर उल्कापात झाल्याचें मला कळलें नव्हतें. मग हें कसें झालें ? त्याचें प्रेम तिच्यावर कसें बसलें ?

सांगायला शरम वाटते, कारण तो त्याच्या मनाचा पाजीपणा होता. तो त्यानेंच मला सांगितला व त्यांत मानवी स्वभावाची एक छटा मला दिसली !

अशा कुणाच्या मनोवृत्ति असतील का ?

असल्यास त्यांचा फायदा होईल; आणि नसल्यास मानवी आचरटपणाचा एक नमुना पाहायला मिळेल !

तो म्हणाला " कुणाजवळ बोलूं नकोस ! "

मीं मनांत विचार केला, " काय करायचं आहे कुणाजवळ बोलून—गंमत असल्यास—त्याची गोष्टच लिहीन ! "

तो पुढें म्हणाला, " हें मला तिनं सांगितलंन्. तिला कोणी कानमंत्र दिला कीं, 'तुझ्या नवऱ्याचा हूडपणा आहे–तूं मनावर घेऊं नकोस. आज ना उद्यां तो ताळ्यावर आल्याशिवाय राहणार नाहीं.' हें लक्षांत ठेवून ती वारंवार माझ्या मुद्दाम नजरेस पडूं लागली. मी बाहेरून यायच्या वेळेला ती मुद्दाम दरवाजांत उभी राही. दोनतीन वेळेला अशा रीतीनं ती मला रस्त्यांतल्या दारांत उभी राहिलेली दिसली. मी तिच्याकडे पाहण्याचं टाळण्याकरितां इकडे तिकडे पाहण्याचं निमित्त करी, पण—छेः छे ! मला संताप आला. आजुबाजूचे किती तरी डोळे तिच्याकडे पाहात होते ! मी मनांत म्हणालों, 'लोक चटोर आहेत—एवढं माझ्या बायकोकडे पाहण्यासारखं काय सौन्दर्य तिच्याजवळ आहे ?' आणि कल्पना येण्याकरितां मीं लोकांच्या दृष्टीनं तिच्याकडे पाहिलं ! काय माझ्या-वर मोहिनी पडली ! आणि राजा—पुढं काय सांगूं ! मी तिच्या-वर त्या वेळेपासून प्रेम करायला लागलों ! आणि मनांत असा विचित्र सिद्धान्त बांधला कीं,

> 'ज्यांचं आपल्या बायकोवर प्रेम नाहीं असे अर्धवट सुज्ञ जर कल्पना करतील कीं, ती आपली स्वतःची बायको नसून दुसऱ्याची आहे, तर त्या विचित्र कल्पनेच्या प्रभावानं स्वतः-च्या बायकोवर झटकन् प्रेम बसेल !'

त्याचें हें सर्व पांडित्य संपण्याच्यापूर्वींच माझ्या तोंडून आश्चर्यो-द्गार बाहेर पडून मी ओरडलों—

" अरेच्या ! "

---

# ठोकळ्याचें चित्र

[ सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ प्रल्हाद केशव अत्रे, बी. ए., बी. टी., टी. डी. ( लंडन ), यांनीं ठोकळ्याचें चित्र या नांवाची एक सुंदर गोष्ट लिहिली आहे. ठोकळ्याला अनेक बाजू असतात. प्रि० अत्र्यांनीं ज्या बाजूनें ठोकळ्याचें चित्र काढलें आहे, तेथें ते स्वतःच उभे असल्यामुळें त्या बाजूनें मला ठोकळ्याचें चित्र काढणें शक्यच नव्हतें म्हणून दुसऱ्या बाजूनें मीं हें चित्र काढलें आहे. अर्थात् गोष्टीचें नांव व कल्पनेचा ठोकळा प्रि० अत्र्यांच्याच मालकीचा आहे. ]

दोन टोले वाजले. तिसरा तास सुरू झाला. ड्रॉइंगचे मास्तर वर्गांत शिरले. मुलांनीं पुस्तकें मिटवून पिशव्यांत ठेवली. ड्रॉइंगच्या वह्या बाहेर काढल्या. मास्तरांनीं पेन्सिली वांटल्या. रबरें वांटलीं. कांहीं पेन्सिलींचीं टोकें मोडलीं होतीं. चाकू घेऊन मुलें तीं तासूं लागलीं.

मास्तरांनीं टेबलावर एक ठोकळा ठेवला होता. चौकोनी ठोकळा होता तो. मान वळवून एकदोनदां त्यांनीं त्याच्याकडे पाहिलें. जरा ठोकळा तिरपा केला. त्यांना समाधान वाटलें.

" हं, करा सुरवात ! हा ठोकळा काढायचा आज. नीट बघा याच्याकडे ! एक डोळा मिटा, व पेन्सिलीनें माप घ्या याचें. रेघा बारीक काढा. खोडाखोड करूं नका. पट्टीनें आंखायचें नाहीं. हातानें रेघा काढायच्या ! आटपा !—"

मुलांनीं एक डोळा मिटून पेन्सिली नाकासमोर धरल्या. माना वांकड्या करून तीं ठोकळ्याचें माप घेऊं लागलीं. मास्तर वर्गाच्या कोपऱ्यांत उभे राहिले. आणि ठोकळ्याकडे ऐटीनें पाहूं लागले. मधून मधून मुलांकडेंहि ते पाहात होते.

" मास्तर, मी फूल काढूं ? " मागल्या बाकावरचा एक हडकुळा मुलगा उठला. त्यानें भीत भीत विचारलें.

"कोण म्हणतो फूल काढूं ? ठोकळा काढायला सांगितला आणि 'फूल, काढूं कोण म्हणतो' ? मूर्ख नाहींतर ! बस खालीं, ठोकळा काढ !"

मास्तर डोळे वटारून बघूं लागले. मुलगा विरमून खालीं बसला. नाका-पुढें त्यानें पेन्सिल धरली व तो ठोकळ्याचें माप घेऊं लागला. त्याचा हात थरथर कांपत होता.

"मास्तर, हा ठोकळा काढीत नाहीं. त्यानें दुसरेंच कांहींतरी काढलें आहे." दुसऱ्या बाजूच्या एका मुलानें तक्रार केली.

"कोण ठोकळा काढीत नाहीं ?" मास्तरांनीं दांत खाऊन विचारलें.

"मास्तर, हा दत्तू साने!" तक्रार करणाऱ्या मुलानें गुन्हेगार दाखविला.

घाबरलेल्या डोळ्यांनीं दत्तू साने भिरभिर पाहूं लागला. वहीच्या पोटांत त्यानें चटकन् चित्र लपवलें, आणि पेन्सिल नाकासमोर धरून तो मास्तरां-कडे बघूं लागला.

मास्तरांच्या नजरेंतून तें निसटलें नाहीं. डोळे गरगर फिरवीत ते त्याजकडे पाहूं लागले. त्यांनीं वही उचलून घेतली व आंतून एक चित्र बाहेर काढलें.

"तूं काढीत होतास हें चित्र?" मास्तरनीं कठोरपणानें विचारलें.

दत्तू बोलला "होय." तो शरमून खालीं पाहात होता. त्यानेंच चित्र काढलें होतें तें. संबंध सकाळ त्यानें त्याजवर घालविली होती व वर्गांत पुरें केलें होतें त्यानें तें.

एका झाडावर पोपट बसला आहे. खालीं हिरवेंगार गवत आहे. अधूनमधून फुलें उमललेलीं आहेत. जवळून एक ओढा वाहात आहे, पाठीमागें डोंगराआडून सूर्य उगवत आहे असें चित्र होतें तें.

दत्तूनें कशांतून न पाहतां तें काढलें होतें. असें चित्र त्यानें पूर्वीं कधीं काढलें नव्हतें. इतका आनंद त्याला पूर्वीं कधीं झाला नव्हता.

पहिल्या दोन तासांत त्यानें त्या चित्राकडे किती तरी वेळा चोरून पाहिलें होतें. आज त्याला त्या चित्रावांचून कांहीं सुचत नव्हतें.

ड्रॉइंगच्या तासाला त्यानें तें थोडें अपुरें राहिलेलें चित्र पुरें केलें होतें.

मास्तरनीं तें चित्र हातांत घेतलें. त्या चित्राकडे पाहून त्यांनाहि फार आनंद झाला. त्यांच्या चेहऱ्यावरचा कठोरपणा मावळला.

" खरंच दत्तू, हें चित्र तूं काढलंस ? "

" हो " दत्तूनें लाजत उत्तर दिलें.

मास्तरनीं आपल्या हातांनीं दत्तूच्या पाठीवर शाबासकी दिली !

नंतर मास्तरनीं वर्गाच्या सेक्रेटरीला हांक मारली आणि दत्तूनें काढलेलें चित्र फळ्यावर टांगून ठेवण्यास सांगितलें.

वर्गातलीं मुलें आश्चर्यानें थक्क झालीं !

दत्तू सान्याची चहाडी सांगणाऱ्या मुलानें तर 'आ' वांसला !

दत्तू सान्याचें चित्र फळ्यावर टांगलें गेलें.

मास्तर टेबलापाशीं गेले. क्षणभर खिडकींतून बाहेर पाहात त्यांनीं कसला तरी विचार केला. एक जांभई दिली.

नंतर त्यांनीं हांक मारली, " दत्तू साने, इकडे ये."

दत्तू साने अजूनहि शरमून एक पाय बाकाच्या दांडक्यावर टाकून वांकडा-तिकडा उभा होता.

त्याला मास्तर कां हांक मारीत आहेत तें कळेना.

तो तसाच उभा राहिला.

" दत्तू," मास्तरनीं पुन्हा हांक मारली.

" काय ? " दत्तू जागेवरून म्हणाला.

" इकडे ये–" मास्तरनीं दत्तूकडे कांहींशा रागानें पाहात म्हटलें.

दत्तू साने मास्तरांच्या टेबलाजवळ आला.

मास्तर त्याच्याकडे पाहून मिस्किलपणानें हंसलें.

" बस ह्या खुर्चीवर–" मास्तरनीं आपल्या खुर्चीकडे बोट दाखवीत म्हटलें.

वर्गांत एकच हंशा पिकला !

दत्तू साने जास्तच शरमला.

" खुर्चीवर बस म्हणून सांगितलें ना ? " मास्तरनीं दरडाविलें.

दत्तू मुळमुळ रडूं लागला.

मास्तरनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं.

अशांत दोन मिनिटें गेलीं. दत्तूचें रडणें चालूच होतें. अखेर मास्तरनीं रडक्या दत्तूला बळेंच आपल्या खुर्चीवर बसविलें.

दत्तू अजागळासारखा खुर्चीच्या हातांवर आपले हात टाकून बसला.

त्याचें मुळुमुळु रडणें चालूच होतें.

वर्गांत हंशा व गडबड जोरांत चालू होती.

मास्तरनीं आपली छडी टेबलावर आपटली आणि आपली रागीट नजर एकदां वर्गावरून फिरविली.

वर्गांत एकदम शांतता पसरली.

मास्तर फळ्याजवळ गेले आणि म्हणाले, " खरंच किती सुंदर चित्र काढलं आहे दत्तूनं. "

" वाः ! फारच छान— पोपटाची चोंच अगदीं खऱ्यासारखी आहे— नाहीं मास्तर " पोरांनींहि त्या चित्राची स्तुति चालविली.

मास्तरनीं पोरांना पुन्हा एकदां गप्प केलें आणि म्हणाले, " चित्र खरंच सुंदर आहे. आणि दत्तूच्या वयाच्या मानानं तर तें फारच छान साधलं आहे; पण मुलांनो, तुम्ही जर खरे विद्यार्थी असाल तर या चित्राच्या संबंधानं काय चूक आहे ती सांगा पाहूं ? "

बरींच मुलें उत्तर देण्याकरितां उतावीळपणानें उठलीं.

मास्तरनीं दत्तू सान्याकडे हंसून पाहिलें.

दत्तूनें आपले रडें आवरलें, डोळे पुसले आणि तो खुर्चीवरून धीटपणानें उठून उभा राहिला आणि म्हणाला, " मास्तर मी सांगूं ?"

" सांगतोस ? सांग पाहूं ? " मास्तर म्हणाले.

" हेंच चित्र जर मीं सगळें घरीं काढलें असतें आणि तासाच्या सुरुवातीला अगर तास संपल्यानंतर मीं तुम्हाला दाखविलें असतें तर तें चित्र चांगलेंच होतें. शिस्त म्हणून आपण ठोकळ्याचें चित्र काढायला सांगितल्यावर मीं ठोकळ्याचेंच चित्र काढायला पाहिजे होतें ! " दत्तू साने अडखळत म्हणाला.

" दत्तू तूं खरा शहाणा आहेस. तूं काढलेल्या या पोपटाच्या चित्रा-पेक्षां तूं आतां दिलेलें उत्तरच फार चांगलें आहे ! " असें म्हणून मास्तरनीं आपले खिसे चांचपले. त्यांतून किल्या बाहेर काढल्या व आपलें कपाट उघडून त्यांनीं एक चित्रांचें पुस्तक बाहेर काढलें व तें पुस्तक त्यांनीं दत्तूचें नांव लिहून दत्तूला बक्षिस दिलें !

दत्तू आनंदानें उड्या मारीत तें पुस्तक घेऊन आपल्या जागेवर जाऊन बसला व आपली चहाडी सांगणाऱ्या मुलाकडे 'कशी जिरली' असें म्हणण्याच्या आविर्भावानें त्यानें पाहिलें.

" ठेव रे तो ठोकळा नेऊन " मास्तरनीं सेक्रेटरीला सांगितलें.

सेक्रेटरीनें टेबलावरचा ठोकळा जाग्यावर नेऊन ठेविला.

नंतर मास्तर म्हणाले, " मुलांनो, मुलांना त्यांच्या कलाप्रमाणें शिक्षण द्यावें असें कांहीं शिक्षणतज्ज्ञ म्हणतात पण त्यांच्या अशा या म्हणण्यानें मुलांनाच चिथावणी मिळून मुलें जास्त उठवळ होतात ! आतां दत्तू सान्यानें हें चित्र काढलें याबद्दल जर मीं त्याला जाणीव दिली नसती तर उद्यां त्या शेजारच्या बापटानें मोराचें चित्र काढलें असतें. कुणी आंबे काढले असते आणि मीं काढायला सांगितलेलें ठोकळ्याचें चित्र अखेर माझें मलाच काढावें लागलें असतें !...." इतक्यांत तास संपण्याची घंटा झाली. " एका दत्तू सान्याच्या चित्रकलेला प्रोत्साहन देण्याकरितां वर्गांतील सर्व मुलांना

उठवळ बनवणें मला परवडणार नाहीं ! अगोदर शिस्त आणि मग सगळ्या गोष्टी ! ”

“ दत्तू, तें फळ्यावरचें चित्र घेऊन जा ! ”

दत्तू साने ओशाळलेल्या चेहऱ्यानें फळ्यापाशीं गेला. पाय उंच करून त्यानें तें फळ्यावरचें आपलें पोपटाचें चित्र काढून घेतलें.

मास्तर त्याच्याकडे पाहातच होते.

दत्तूनें त्या चित्राकडे एकदां पाहिलें. त्याचे डोळे पाण्यानें भरून आलें. त्यानें आपल्या मनांत कसला तरी कठोर निश्चय केला; आणि आपल्या हातानें त्यानें तें सुंदर चित्र फाडून त्याच्या चिंध्या केल्या आणि टोपलींत टाकून दिल्या.

मास्तर म्हणाले “ कां रे दत्तू ? ”

“ मी उद्यां घरीं असेंच चित्र काढीन. आतांपेक्षां चांगलें येईल तें; आणि मी उद्यां पुन्हा तुम्हांला दाखवीन— ”

“ शाबास ! उद्यां पुन्हा जरूर काढून आण. मी तें फ्रेम करून वर्गांतच लावून ठेवीन ! ”

मास्तरना दत्तू सान्याचा अभिमान वाटला, त्यांनीं खिशांतलें घड्याळ काढून पाहिलें आणि ते वर्गाबाहेर निघून गेले.



# ग्यानबा-तुकाराम आणि टेक्निक् !

'सहज पडे आणि दंडवत घडे' अशी कांहीं कांहीं वेळेला मोठी मजेदार हकीगत होते. तसेंच कांहींसें त्याचें झालें होतें !

त्याची मला लहानपणापासूनची माहिती आहे ! शिक्षणाभावीं त्याला कुठें नोकरी नव्हती. भांडवलाच्या अभावीं धंदा नाहीं. अशा तऱ्हेनें सहानुभूतिशून्य परिस्थितींत त्याच्या मनाला बराच ताण बसलेला होता ! नुसता ताणच नव्हे तर त्याचें मन पूर्णपणें चेचून निघालें होतें !

सुमारें वीस वर्षांपूर्वींची गोष्ट. त्याचा थोरला भाऊ प्लेगच्या सांथीला बळी पडला. तो वकिलीच्या परीक्षेला बसलेला होता आणि त्यानें 'दैवलीला' या नांवाचें एक नाटकाहि लिहिलें होतें ! पण प्लेगला बळी पडल्यामुळें वकिलीचीं पुस्तकें त्याच्या घरांत राहिलीं आणि वाङ्मय ही चीज काय आहे तें त्याला कळायला लागण्यापूर्वींच त्याच्या एका आप्तानें " कांहींतरी करतो " म्हणून तें 'दैवलीला' नाटक जें नेलें तें कुठें तरीच हरवून टाकलें.

इतर कांहीं जरी करतां आलें नाहीं तरी मनोराज्यें प्रत्येकाला करतां येतात ! त्याप्रमाणें त्या बालवयांतहि तो म्हणे, " मी वकील तरी होणार—आणि वकिलीचें नाहींच जमलें तर लेखक होणार—माझ्या थोरल्या भावाची अतृप्त इच्छा——"

तो म्हणत होता तें सगळें ठीक होतें—पण मार्ग मात्र कोणत्या-च इच्छेला नव्हता ! त्याच्या गृहसौख्याची द्वारका कोसळलेली होती ! नवीन खांब देऊन पहिला जुना खांब काढून टाकतात—

पण त्याचा थोरला भाऊ गेल्यामुळें जुन्या खांबावरच पुन्हा घर कोसळलें— तो जुना खांब म्हणजे त्याचे वडील !

घर कोसळलें ! त्याचे वडील खांबासारखे पुन्हा उभे राहिले. पण त्या कोसळलेल्या परिस्थितींतहि त्याच्यावर तें छत्र होतें ! त्या चिमण्या अडगळीच्या संसारांतहि तो सुखासमाधानानें राहात होता !

नंतर कांहीं वर्षांनीं त्याला एक बरीशी नोकरी मिळून तो जरा आनंदानें दिवस काढूं लागला !

जरा स्थिरता आली कीं, पुन्हा मनोराज्यें करायला सवड सांपडते. त्याची वकिली आतां कल्पनेंतच राहिली होती; पण लेखक व्हायची त्याला अजून आशा वाटत होती !

येवढें एक बरें होतें कीं, लेखनाला 'कागद—दौत--टाक' यांखेरीज आणखी कांहीं लागतें याची त्या वेळेला त्याला कल्पना नव्हती !

वाचन कांहींच नाहीं ! नंतर त्याला एक कल्पना सुचली. तो म्हणे, कल्पनेनें लिहिण्यापेक्षां आपण खरेंच लिहावें. म्हणून खेह्यासोबत्यांना तो चहा पाजून त्यांच्या घरगुती गोष्टी ऐकूं लागला ! तो म्हणे, त्या गोष्टी मी नांवाशिवाय लक्षांत ठेवीन आणि नंतर त्यांची गल्लत करून स्वतंत्रच गोष्टी लिहीन !

असें बरेच दिवस चाललें होतें ! त्याच्या टेबलावर बरेच कागद काळे होऊन पडूं लागले—अर्थात् त्यानें छापण्याचा विचारच केला नव्हता ! अलीकडे रस्त्यानें तो जरा ताठ मान करून चालत होता ! त्याला वाटत होतें— कीं आपण झालों आतां लेखक !

आतां त्यानें ठरविलें कीं, आपण आपल्या गोष्टी छापून काढाव्यात ! त्या वेळेला लघुकथांचा इतका काळ नव्हता ! तो भराभर पोस्टाचीं तिकिटें खर्च करूं लागला !

—अर्थात् उलट टपालानें गोष्टी परतही येऊं लागल्या ! एक

दिवस त्यानें परत आलेली एक गोष्ट मला अभिमानानें दाखविली. तो म्हणाला, "गोष्ट परत येईना का–पण गोष्ट **'साभार'** परत आलेली आहे!"

—नंतर कांहीं दिवसांनीं तो केंविलवाण्या व रडव्या चेहऱ्यानें माझ्याकडे परत आलेली एक गोष्ट घेऊन आला आणि म्हणाला, "हीच ना आमच्या लेखनाची किंमत?"

"कां—काय झालें?" मीं विचारलें.

त्यानें गोष्टीचे कागद माझ्या टेबलावर उघडून ठेवले. ते कागद पाहतांच त्याचा चेहरा रडवा झाला यांत कांहींच नवल नाहीं. पण मलाहि भयंकर चीड आली! संपादक-महाशयांनीं ऑफिसमध्यें बसून चहा पितांना संपादकीय टेबलावर डाग पडूं नये म्हणून चहाचा कप त्या गोष्टीच्या पहिल्या पानावर ठेवलेला होता, व त्या कपाचें वर्तुळ– त्या पहिल्या पानावर स्वच्छ उमटलेलें होतें!

काय बोलायचें आणि काय लिहायचें??

तो निराशेनें म्हणाला, 'आतां घरीं जातों आणि लिहिलेलें सर्व जाळून टाकतों–फाडून टाकतों! चहाचे कप ठेवायची रद्दी कशाला निर्माण करूं विनाकारण.'

मीं त्याला शांत केलें आणि म्हटलें, "हें पाहा– फार झालें तर इथून पुढें लिहूं नका– पण लिहिलेलें जाळूं नका!"

"मग काय करूं त्या लिखाणाचं?"

"तुम्हांला जी तुमची उत्कृष्ट गोष्ट वाटत असेल ती एकदां सर्व मासिकांकडे जाऊन येऊं द्या!"

तो हताशपणानें म्हणाला, "ते सर्व सोहाळे झालेले आहेत!"

मीं हाताशीं असलेलें वर्तमानपत्र सहज चाळलें. त्यांत एका नवीन निघणाऱ्या मासिकाची जाहिरात होती. त्याला धीर देण्याकरितां मीं म्हटलें, "हें पाहा— हें नवीन मासिक तुमच्या-

करितां निघतें आहे. उद्यां या मासिकाच्या ऑफिसांत जाऊन समक्ष गोष्ट देऊन या !"

तो निराशच होता; पण तरीही त्या नवीन निघणाऱ्या मासिकाच्या ऑफिसांत तो गेला आणि संपादकाला म्हणाला, 'ही माझी गोष्ट वाचून पाहा, ही सर्व मासिकांकडून परत आलेली आहे. तुम्हांला पसंत असली तर छापा, नाहीं तर विनंति येवढीच कीं, ही गोष्ट माझ्याकडे परत पाठवूं नका—तुम्हीच फाडून टाका—माझ्या हातानें मला मीं लिहिलेली गोष्ट फाडतां येणार नाहीं—बरं आहे—जातों.' असें म्हणून तो नमस्कार करून उठला !

संपादक आश्चर्यानें त्याच्याकडे पाहातच राहिला ! ते फाटके कपडे—ती वाढलेली दाढी—तें आडमाप शरीर—संपादक मनांत म्हणाला, 'हें ध्यान काय लिहिणार ?—पण वाचून तर पाहूं या ! डोंगरांतूनच नदी उगम पावते !'

संपादकानें त्याची गोष्ट वाचून पाहिली. हळुवार जिव्हाळ्यानें त्यानें ती लिहिलेली होती.

संपादकानें पहिल्याच अंकांत त्याची ती गोष्ट छापली ! आणि नंतर नित्यनेमानें त्याच्या गोष्टी त्या मासिकांत येऊं लागल्या !

पण नंतर एक मात्र झालें. त्याला नवीन नवीन स्नेही लाभले; पण त्या स्नेह्यांची कुरकुर एक चाले, "गोष्टी बऱ्या असतात पण त्या टेक्निक्मध्यें बसत नाहींत !"

आली कां आता पंचाईत !

'टेक्निक्' हें काय आहे हें त्या वेळेलाहि त्याला माहीत नव्हतें आणि अद्यापहि त्याला माहीत नाहीं !

तो म्हणे, "नाटक करायचें असलें तर त्याला अभिनय आणि कपडे, पडदे लागतात ! पण मला कुठें अभिनय करायचा आहे ? मला कुठें नाटक करायचें आहे ? मनुष्याच्या जन्माबरोबर

जसा त्याच्यांत जीव येतो त्याप्रमाणें ज्या कथा माझ्या कानांवर येतात आणि अंतःकरणाला त्या कुठें तरी बोंचल्यामुळें मला लिहाव्याशा वाटतात त्या कथांतील प्रसंगांबरोबर–त्यांत टेक्‌निक् का काय म्हणतात त्याचाहि जन्म होत नसेल का ? तयार कपड्यांच्या व्यापाऱ्यांप्रमाणें मी काय लघुकथांचा महिंद्रकर बनूं ? ”

तो त्याच्या स्नेह्यांजवळ या टेक्‌निक्‌बद्दल खूप वितंडवाद खेळे; पण नंतर त्याला समजून चुकलें कीं, जसें त्याला टेक्‌निक्‌बद्दल कांहीं कळत नव्हतें तसें त्या स्नेह्यानांहि फारसें कळत नव्हतें ! आणि अर्धवट वडबड ही घातुकच नव्हे का ? पण हा एक शिष्टसंप्रदाय आहे ! चार विद्वान म्हणतात टेक्‌निक् पाहिजे. हेहि जांभया देत चुटक्या वाजवीत म्हणतात–

“ खरं आहे आपलं म्हणणं ! ”

एक दिवस तो स्नेह्यांशीं असाच वितंडवाद खेळत बसला होता. विषय होता अर्थात् लघुकथांचाच–आणि भांडाभाडी होती–टेक्‌निक्‌बद्दलचीच !

त्याचा स्वभाव अगोदर कांटेकोर वृत्तीचा नव्हताच मुळीं ! तें आपलें एक सोलापुरी माप होतें ! लघुकथा आणि टेक्‌निक् म्हटलें कीं, तो म्हणे “ येवढीशी लघुकथा ती काय आणि त्याला कसलें आलें आहे टेक्‌निक् ? आणि असलेंच तर अमका असें म्हणतो म्हणून तेंच कां असावें ? जशीं सगळीं माणसेंच पण प्रत्येकाचा चेहरा निराळा असतो, त्याप्रमाणें प्रत्येक लेखकाचें टेक्‌निक् स्वतंत्र कां असूं नये ? ज्याला जसें लागेल तसें तो तिखट मीठ घालील– ज्याला चार पोळ्या पचतील तो चार खाईल– टेक्‌निक्‌वाला कदाचित चतकोर पोळी खाऊनच ढेंकर देऊन उठेल ! हा ज्याच्या त्याच्या ऐपतीचा प्रश्न आहे ! जिथें तुम्हांला बनवून–कल्पनेची भांग पिऊन गोष्टी लिहायच्या असतील त्या वेळीं

तुम्ही सावधगिरीनें टेक्निक्चा हात धरून चाला—पण मीं जर भांग घेतलेली नाहीं—तर टेक्निक्ची " अशी लवे तशी लवे " करणारी वेताची छडी घेऊन तिच्या आधारावर मी काय म्हणून चालूं ? जिथें कलेची—ध्येयाची कसरत करायची असेल तिथें 'असाच शेवट पाहिजे—इतकी लांबी-रुंदी पाहिजे' वगैरे सतरा पंचाइती करा. पण मी म्हणतों माझें लेखन म्हणजे जिवंत कॅमेरा आहे ! माझ्या चालू जीवनांत मी जसा आणि जिथें फिरतों त्याच्या आसपासचा जिवंत फोटोग्राफ आहे माझें लेखन म्हणजे ! "

एक दिवस तो मला म्हणाला, " खरंच लेखनाला जर इतके तंत्र आणि धरबंध असतील तर तें कराच कशाला ? पण एक सांगतों-- जशी मला भूक लागते तशी लेखनाचीहि मला मधून मधून भूक लागते—छापून आलें नाहीं तरी चालेल ! पण लिहून ठेवावेंसें वाटतें ! माझ्या मनाचें तें समाधान आहे. मग तें टेक्-निक्मध्यें बसो अगर न बसो ! आणि टेक्निक्बद्दलच म्हणायचें झालें तर मी असें म्हणेन कीं, जें जें टेक्निक्मध्यें बसत नाहीं तें तेंच जास्त खपतें आहे किंवा जगांत ज्या वस्तु टेक्निक्मध्यें बसत नाहींत त्याच फार उपयोगी असतात ! मनुष्याच्या देहाचेंहि टेक्निक् ठरलें आहेच ना ? उंचीच्या कांहीं तरी प्रमाणांत माणसा-चें वजन असावें लागतें ! पण उद्यां जर एकादा हेर हिटलर जन्माला आला आणि त्यानें कायदा केला, कीं जेवढे मानवी देह या उंची-वजनाच्या टेक्निक्मध्यें बसतील तेवढेच जिवंत ठेवायचे आणि बाकीचे सर्व गोळ्या घालून ठार मारायचे—तर मला सांगा, यांतून किती लघुकथा-लेखक, कादंबरीकार, नामांकित वक्ते, गवई, देशभक्त आणि बुद्धिमान धुरंधर आपला जीव या टेक्निक्च्या गोळींतून बचाऊं शकतील ? "

एक दिवस त्याच्याकडे कांहीं स्नेही आले आणि त्याला म्हणाले,

" तुमचें म्हणणें कांहींहि असो–आम्ही सांगतों हीं पुस्तकें तुम्ही वाचा आणि मग टेक्निक्बद्दल तुमचें मत बदलतें कीं नाहीं तें पाहा " असें म्हणून त्यांनीं कांहीं इंग्रजी पुस्तकांची यादी त्याच्या हातांत दिली. ती यादी उघडून न पाहतांच घडी करून टेबलावर ठेवीत तो म्हणाला, " अच्छा ! जरूर वाचून पाहतों ! "

* * *

दुपारचा पांचचा सुमार होता त्या वेळीं. तो म्हणाला, " चला, आपण आतां कुठें तरी फिरायला जाऊं या." मी तिथें होतोंच मलाहि तो म्हणाला, " काय येता का हो ? "

नाहीं म्हणून माझें कसें भागणार होतें ? लेखक ना तो ? त्याची लहर आम्हीं संभाळलीच पाहिजे !

आम्ही सर्वजण बाहेर पडलों. मोठ्या रस्त्याला लागतांच–रस्त्यांनीं वावरणाऱ्या गर्दीचें रूप आज कांहीं निराळेंच दिसलें.

रस्त्यांत अलोट गर्दी होती ! पण ती मानपत्राची नव्हती–व्याख्यानाला जाणारी नव्हती–एकाद्या लग्नसमारंभाचीही गर्दी नव्हती ती !

आमच्या कुणाच्याच लक्षांत नव्हतें. आज ज्येष्ठ वद्य नवमी होती ! ज्ञानरायांची पालखी आज यायची होती !

सर्व तऱ्हेचे आणि सर्व जातींचे लोक आजच्या गर्दीत प्रामुख्यानें दिसत होते.

" टेक्निक् " या शब्दाचा जप करीतच तो आमच्याबरोबर बाहेर पडला होता !

इतक्यांत दोन-चार पोरें–कांबट्यांची केलेली ल्हानशी पालखी, रंगीत कागदानें नटविलेली–अशी खांद्यावर घेऊन, कपाळाला गुलाल फांसून, अलड उत्साहानें बागडत लगतच्याच बोळानें त्या मोठ्या रस्त्यावर आलीं.

तोंडानें बडबडत होतीं,'ग्यानबा-तुकाराम—ग्यानोबा-तुकाराम !'

ओहोहो ! कोण ऐट पण ! ती साडेतीन वीतींची पालखी, पण प्रत्येक बाजूला दोन दोन पोरांनीं खांदा दिला होता !

वास्तविक एकाच पोरानें तसल्या छपन्न पालख्या एका कांखोटींत मारून सहज तो दोन मैल पळत आला असता; पण ती त्या पोरांच्या खांद्यांवरची पालखी रिकामी नव्हती ! त्या पालखींत त्यांच्या भावनेचा 'ज्ञानोबा' बसला होता ! आणि तसला ज्ञानोबा वाहून न्यायचा— कोण प्रेमळ सोहळा तो !

आतां माझ्या लक्षांत आलें, ज्ञानरायांची पालखी आज पुण्याहून पंढरपूरला जाणार होती !

आम्ही तसेंच पुढें झालों—पण आतां फारसें पुढें जाणें शक्य नव्हतें ! आम्हीं आजूबाजूला चवकशी केली, "पालखी कुठपर्यंत आली आहे ?"

"लकडी पुलाशीं आली असेल" उत्तर आलें.

अजून तासभर तरी पालखी यायला लागणार ! तो म्हणाला, "थांबूं या आपण इथेंच पालखी जाईपर्यंत—"

"थांब तुला थांबावयाचें असलें तर" त्याचे स्नेही म्हणाले.

"तुम्हीही थांबणार ना ?" त्यानें विचारलें.

"हो—थांबूं या कीं—नाहीं तरी आम्ही आतां काय करणार ? राहूं या उभे ज्ञानबा-तुकाराम करीत ! आज आतां कांहीं गांवांत कोणच्याहि सिनेमाचा मॅटिनी नाहीं ! दरवर्षीच्या या दंगलीला—गांवांतल्या एकाद्या सिनेमानें तरी मॅटिनी ठेवायला पाहिजे ! आणि ती सुद्धां "लव्ह परेड !" आणि नंतर इंग्लिश नाचाच्या पद्धतीवर तो रस्त्यांतच हावभाव करूं लागला ! मार्चिंग सॉंग "पिंग—पॉंग—पिंग पॉंगऽऽ"

पण इतक्यांत एका द्वाड माणसाचें लक्ष त्याच्याकडे गेलें—तो

द्वाड माणूस माणसें रेटीतच पुढें आला आणि त्या ‘लव्ह परेड’च्या कपाळीं गुलाल फांशीत तो द्वाड माणूस ओरडला !—

“ ग्यानबा-तुकाराम–ज्ञानोबा-तुकाराम ! ”

आजूबाजूच्या लोकांनींहि त्या ओरडण्याला साथ केली. आतां एवीं तेवीं कपाळाला गुलाल लागलाच आहे, तेव्हां पालखी पाहूनच जावें असें आम्हीं ठरविलें आणि ती ‘लव्ह परेड’ची जागा बदलून जरा दुसऱ्या कोपऱ्यावर जाऊन उभे राहिलों.

कांहीं वेळ असाच गेला. नंतर फुलांचा सुवास जसा लांबूनच येतो त्याप्रमाणें मनामध्यें गोड काहूर उत्पन्न करणारा आवाज ऐकूं येऊं लागला ! घरांच्या सज्जांत–पत्र्यांवर–छपरांवर उभीं राहिलेलीं मुलें–सुवासिनी–बाया-बापड्या–म्हाताऱ्या वांकून पाहात कुजबुजूं लागल्या, “ पालखी आली बरं का ? ”

—माणसांच्या गडबडीचा गोंगाट आणि त्यांतच टाळ-झांजांचा आवाज ! चौघड्याची गाडी–तीं भगवीं निशाणें–तीं रोडकींमोडकीं तट्टें– त्या वारीला चाललेल्या म्हाताऱ्या बाया-बापड्या ! हातांत पितळेचीं तुळशीवृंदावनें घेऊन निघालेल्या वारकरणी, त्यांतच एकादी स्थानिक माळीण हातावर बेलफुलें घेऊन “ पालखीला बेलफुलं ” करीत हिंडते आहे ! एकाद्या वारकऱ्यानें नुसती लंगोटीच घातली आहे ! एकादा वारकरी कुणाचीही साथ न करतां पागोट्याचा सुटून कपाळावर आलेला पदर सावरीत सावरीत हाताच्याच टाळ-झांजा करून “ ग्यानबा-तुकाराम ! ग्यानबा-तुकाराम ! ! ” म्हणून स्वतः रंगून स्वतःभोंवतींच नाचत फिरतो आहे !

पंढरीच्या वाटेला लागलेल्या त्या भक्तीच्या लोंढ्यांत–स्थानिक भजनी दिंड्या–त्यांतील म्होरक्या तोंडानें एकादा अभंगाचा चरण सांगत व बाकीचे, दिंडीवाले तोच चरण पुनः पुन्हा म्हणत–

ती भक्तीची नदी दुथडी वाहात होती आणि तीवर हे लोक फुला-प्रमाणें तरंगत वाहात होते !

असा अलोट आणि अफाट जनसंमर्द—नाना तऱ्हा—नाना जाती, मधेंच शृंगारलेला ज्ञानरायांचा घोडा— त्याच्याबरोबर ते संस्थानी पट्टेवाले—आणि त्या पालख्या—

पालखी आली !

'शुभमंगल सावधान' म्हणतांच—जशा सर्व बाजूंनीं वधूवरांच्या मस्तकांवर अक्षता पडूं लागतात त्याप्रमाणें पालखी येतांच सर्व दिशांनीं फुलें आकाश-वृष्टीसारखी पडूं लागलीं ! आंब्याचे सडे पडूं लागले ! साखर-फुटाणे, बत्तासे चौफेरानें येऊं लागले ! तो गोड मारा चुकवीत, पालखीवाले ते सर्व आंबे, बत्तासे गोळा करीत आहेत— त्यांतच पैशांचा सडा ! !

पालखीवाले प्रसाद म्हणून आलेले आंबे-बत्तासेच पुन्हा दोन्ही हातांनीं गर्दीवर लूटमाप उधळीत आहेत ! प्रसाद हस्तगत करण्या-करितां लोकांची धांदल उडाली आहे—

पालखी पुढें सरकली—

पुन्हा जयघोष—

" ज्ञानबा-तुकाराम ! ज्ञानोबा-तुकाराम ! ! "

आतां राहिलेली पाठीमागची अफाट गर्दी त्याच तालावर पुढें चालूं लागली ! भावनेचा पगडा माणसांवर काय झटकन बसतो ! मलाही वाटलें, कीं सोडावे स्नेही इथेंच आणि आपणाहि शिरावें त्या घोळक्यांत " ज्ञानबा-तुकाराम " म्हणत !

नंतर पाऊण एक तासानें तो सर्व सोहळा संपला ! रस्ते रिकामे पडूं लागले तरी तो माझ्याशेजारीं गुंगींतच उभा होता !

इतक्यांत त्याच्या स्नेह्यानें त्याला हलवून जागे केलें आणि म्हटलें, " चल ना ! "

तो सर्व बेशिस्तपणानें पण शिस्तींत गेलेल्या अफाट जनसंमर्दा-कडे पाहून गोंधळलेल्या त्याच्या मनानें तो पटकन म्हणाला, " काय रे, या पालखीचे टेक्निक् काय आहे ? कां एवढा समाज या पालखीमागें ? कां इतका वेळ तिष्ठत होते हे सर्व लोक ? कोणती जादू–कोणती मोहिनी–कोणतें टेक्निक् आहे यांत ? "

कोणी कांहींच बोललें नाहीं !

अखेर तोच म्हणाला, " एका भक्तीच्या जिव्हाळ्याखेरीज याला कसलं आलं आहे टेक्निक् ? जिव्हाळा असेल तर टेक्-निक्ची जरूरी नाहीं आणि जिव्हाळा नसेल तर टेक्निक् पाहिजेच ! ! "

* * *

एक दिवस सहज त्याचा एक मित्र त्याला म्हणाला, " तुझ्या कांहीं गोष्टी फार सुंदर आहेत. एक तर उत्कृष्ट आहे–पण तुझ्या सगळ्याच गोष्टी कांहीं चांगल्या नसतात ! "

मिस्किलपणानें हंसत हंसत तो म्हणाला, " मग मीं असं कधीं म्हटलं होतं का ? आणि एकाच माणसाच्या सगळ्याच गोष्टी कशा चांगल्या असणार ? मित्रांनो, तुम्हांला असं एकादं फुलझाड माहीत आहे का, कीं ज्याला पान-फांद्या न येतां फक्त फुलेंच येतात आणि फुलं आलीं तीं एकसारखींच येतात ? "

* * *

मध्यंतरीं पांच एक महिने गेले असेच ! त्या अवधींत त्यानें फारसें कांहीं लिहिलें नव्हतेंच–नाहीं म्हटलें तरी टेक्निक्चा बागुलबुवा अलीकडे त्याला थोडातरी भेडसावीत होताच !

एक दिवस तो मला म्हणाला, " मला हंसायला येतं–जे लोक टेक्निक्ची शिस्तींत बडबड करतात–त्यांच्या गोष्टी ? ? छे: असं कसं बोलायचं ! ! मला वाटतं टेक्निक्ची जो बडबड करील

त्यानं आपली अब्रू संभाळायची असेल तर "टेक्स्ट" कांहीं लिहूंच नये !

*  *  *

एक दिवस रात्रीं दहा-अकराचे सुमारास त्याच्या मित्रांसकट आम्ही 'सोडा-लेमन' पिण्याकरितां बाहेर पडलों होतों. आम्ही आनंदानें चकाट्या पिटींत चाललों होतों.

पण रस्त्यांतील एका चौकांत आम्हांला अडून उभे राहावेंच लागलें ! एक दारूचें झाड चौकांत उभें केलेलें होतें आणि दारू-वाला ते शिलगावीत होता !

दारूचें झाड पेटलें. प्रकाशाचा फुलोरा नाचूं बागडूं लागला !

झाड संपत आलें तशी घाण सुटूं लागली. आम्ही नाकांला रुमाल लावीत बाजूला झालों.

तों स्काउट बँड पुढें आला. नंतर ताशा, वाजंत्री नंतर एक मोटार फुलानें शृंगारलेली. मोटार इंजिनवर उष्णतेनें फुलें सुक-लेलीं आहेत. आंत एक जोडपें बसलें होतें. वरात होती ती !

नंतर जांभया देत चाललेल्या, ठेवणीच्या कपड्यालत्त्यांनीं व दागिन्यांनीं नटलेल्या पंधरा-वीस बायका—त्यांच्यामागून पगडी-उपरणेवाले पांच-सहा पुरुष व कांहीं मुलें—मागें बायकांनीं भरलेले एक-दोन टांगे असा एक समारंभ आळसटलेला पण शिस्तींत चालला होता !

किती नीट-नेटका ? किती बेतासबात ? कसा आपला आपल्यां-तच गुरफटलेला ? !

"बस्—बस्-बस्" तो बेछूटपणानें ओरडला. "हें टेक्-निक्चें उत्कृष्ट उदाहरण ! हीच टेक्निकल् वरात !"

इतक्यांत एका माडीची खिडकी उघडूं लागली. आम्ही त्या

माडीच्या खालींच उभे होतों. आम्हीं सहज वर पाहिलें. एक चौदा-पंधरा वर्षांचा पोरगा खिडकी उघडण्याचा प्रयत्न करीत होता!

तोंच आंतून म्हातारा आवाज ऐकायला आला, "काय रे सदू, कशाला खिडकी उघडतो आहेस?"

"कांहीं नाहीं बाबा–वरात पाहतों आहे!"

पुन्हा तोच म्हातारा आवाज–'मग वरातीला काय रे पाह्यचं आहे? नेहमींचीच आहे ती! चल, लाव ती खिडकी आणि झोंप मुकाट्यानं!' खिडकी पुरी न उघडतांच पुन्हा लावल्याचा आवाज आला!

बिचारें पोर झोपलें वाटतें!!

तो स्वतःच्या मिशीवर विनाकारणच पीळ भरीत म्हणाला, "दोस्त हो, टेक्निक् म्हणजे सजवलेली वरात–आणि जिव्हाळ्यानें सहज नटलेली ती पालखी! बोला, मी टेक्निक्च्या वरातींत सामील होऊं कां जिव्हाळ्याच्या पालखींत?"

इतक्यांत त्याचा एक मित्र त्याला म्हणाला, "बस्स–इथेंच पुरें–आपल्याला काय म्हणायचें आहे हें वाचकांना कळायला पाहिजे–आणि गोष्ट अशी अर्धवट सोडायला पाहिजे, कीं वाचकांच्या मनाला ती बोंचत राहिली पाहिजे! आपल्याला काय म्हणायचें आहे तें आपणच नाहीं सांगतां कामा—"

माझा गोष्टीशींहि संबंध नाहीं आणि टेक्निक्शीं त्यापेक्षांहि नाहीं; पण थोडेंसें त्यांचेंहि ऐकावें म्हणून येथेंच



पूर्ण विराम

उत्साहाच्या भरांत मी एका कोंदट कारागृहांत शिरत आहे याची मला कल्पना नव्हती. आंज मात्र या दीड खणाच्या जुनाट व ओलसर खोलींत ही हकीगत लिहून काढतांना मात्र **मुक्तता** झाल्याचा आनंद मला होत आहे.

**होय ! प्रत्यक्ष खऱ्याखुऱ्या कारागृहांत मुक्ततेचा आनंद वाटावा असाच असतो परतंत्र देशाचा उलटा जीवनक्रम !**

लेखनकाल

२४ जून १९४०<br>ते<br>१६ जुलै १९४०

अमदाबाद.



# प्रो. देशपांडे यांचे ग्रंथ.

(१) **प्रो. फडके–चरित्र आणि वाङ्मय.** (प्रो. फडके यांच्या ललितरम्य लिखाणाचें अत्यंत आल्हादकारक व मनोरम पद्धतीनें केलेलें विश्लेषण. महाराष्ट्रीय विद्वानांनीं या ग्रंथाची मुक्तकंठानें प्रशंसा केलेली आहे.)

(२) **आचार्य अत्रे–चरित्र आणि वाङ्मय.** (श्री. अत्रे यांच्या ध्येयशून्य व अमार्मिक लिखाणाचें मर्मभेदक पण शास्त्रशुद्ध रीतीनें केलेलें विश्लेषण मराठी टीका-वाङ्मयांत अपूर्व समजलें जातें. इतक्या निर्भीड भाषेत लिहिलेला मराठींत दुसरा टीका-ग्रंथ नाहीं. या टीका-ग्रंथानें प्रत्यक्ष लेखकाची इतकी तारांबळ कां उडविली ते वाचल्यावांचून समजणार नाहीं.)

(३) **खांडेकर–चरित्र आणि वाङ्मय.** (श्री. खांडेकर यांच्या वाङ्मयाची गुणदोषात्मक चर्चा करणारा हा ग्रंथ पहिल्या दर्जाचा टीका-ग्रंथ समजला जातो. 'गेल्या दहा वर्षांत असला सरस टीका-ग्रंथ झाला नाहीं,' असा विद्वानांचा अभिप्राय आहे. फडके व खांडेकर यांच्या वाङ्मयाचें यांत केलेलें तुलनात्मक परीक्षण अप्रतिम आहे. खांडेकर-भक्तांना हा ग्रंथ अमूल्य ठेवा वाटेल.

वरील तीन टीका ग्रंथांनीं मराठी वाङ्मयांत नूतन टीका-लेखन-पद्धतीचें दालन उघडलें आहे. बी. ए. व एम्. ए. च्या विद्यार्थ्यांना व तरुण साहित्यिकांना अध्ययनास अत्यंत उपयुक्त.

✓ (४) **केळकर–चरित्र आणि वाङ्मय.** (अशोक प्रिंटिंग प्रेसतर्फे हा ग्रंथ प्रकाशित होत आहे. एका साहित्यसम्राटाच्या विशाल साहित्य-संसाराचा अतिशय मोहक भाषेत करून दिलेला परिचय मार्गदर्शक वाटल्यावांचून रहाणार नाहीं.)

(५) **वाङ्मय–दर्शन.**

(vi) Merchant of Venice—An Essay in Literary Appreciation.

(७) **धूम्रतरंग** (गुजगोष्टींचा संग्रह).

(viii) English for Commerce.

✓(९) **वंचना व इतर कथा.**

✓(१०) **मुक्तता.**